# बा ल क वि

## काव्यसमीक्षणात्मक प्रबंध

लेखक
प्रा. रा. शं. वाळिंबे, एम्. ए.

चि त्र शा ळा प्र का श न, पु णें

डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, एम्. ए. पीएच्. डी.

यांस—

# प्रास्ताविक

मित्रवर्य डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांस—

सप्रेम नमस्कार विनंति विशेष,

बालकवींच्या काव्याचें विविध दृष्टींनीं समीक्षण करणाऱ्या या प्रबंधाचा आपण स्वीकार करावा अशी माझी आपणांस विनंति आहे. ही विनंति मी आपणांस करीत आहे याला एक महत्त्वाचें कारण आहे. कोणत्याहि विषयाचा अगदीं मुळापासून सूक्ष्म व व्यापक अभ्यास करणें ही गोष्ट आपल्या स्वभावांत भिनलेली आहे. असल्या सूक्ष्म अभ्यासाची व विश्लेषणाची आसक्ति एकदां निर्माण झाली म्हणजे काव्यासारख्या ललित कलेंतील रसाचा आस्वाद घेण्याची शक्ति क्षीण होते असें म्हणतात. परंतु आपल्या बाबतींतील माझा अनुभव अगदी निराळा आहे. मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा आपण ज्या विश्लेषणपद्धतीनें पिंजून पिंजून अभ्यास करतां त्याच पद्धतीनें काव्याचाहि अभ्यास आपण करतां हें खरें. पण एकदां हें विश्लेषण पुरें झालें आणि आपल्या सूक्ष्मग्राही दृष्टीनें काव्यांतील मर्मस्थळांचें आकलन आपण केलें म्हणजे निर्णयाला अनुकूल अशी आपली मनोभूमिका होते. आणि या अवस्थेंत झालेला निर्णय बोधपूर्व किंवा जाणिवेनें युक्त असल्यामुळें त्याची महती अधिक आहे असें मी मानतों.

आधुनिक आत्मनिष्ठ, व्यक्तिवादी कवींच्या काव्याचा अभ्यास करण्याच्या वेळीं पुढील पद्धतीचा अवलंब करावा असें मला वाटतें. कवीच्या चरित्राची माहिती आरंभीं करून घेऊन त्या माहितीच्या आधारें त्याच्या काव्यांत प्रकट झालेल्या विविध प्रवृत्तींचें विश्लेषण करतां येण्यासारखें असतें. परंतु चारित्रांच्या बाबतींत आपल्याकडे भारीच दारिद्य आहे. माकडकथा म्हणजेच चरित्र अशीच बहुतेकांची समजूत झालेली दिसते.

शिवाय कवींची तारीखवार साधार चरित्रें ज्यायोगें लिहितां येतील अशी साधनसामग्रीहि पाश्चात्य राष्ट्रांत उपलब्ध होते त्याप्रमाणें आपल्याकडे होणें शक्य नाहीं. आत्मनिष्ठ कवींच्या काव्याचें खरें मर्म समजावून घ्यावयाचें असेल तर त्यांच्या खाजगी जीवनांतील अनेक घटनांची यथातथ्य माहिती असणें जरूर असतें. मनःस्थितींचें प्रामाणिक आविष्करण करणें हाच भावगीतांचा प्रधान हेतु असल्यामुळें कवीच्या चारित्र्यांतील घटना व त्याच्या कवनांत प्रकट झालेली तत्कालीन भावना यांचा मेळ घालणें सोपे होतें व काव्याच्या मर्माचें आकलन करणें शक्य होतें. अनेक पाश्चात्य आत्मनिष्ठ कवींच्या भावगीतांचा अभ्यास या पद्धतीनें टीकाकारांनीं केलेला आहे. असा अभ्यास आपल्याकडेहि व्हावयास पाहिजे. पण भरपूर साधनसामग्रीच्या अभावीं केवळ आठवणी आणि आख्यायिका या स्वरूपाचीं जीं चरित्रें उपलब्ध आहेत त्यांचा या दृष्टीनें फारसा उपयोग नाहीं. विशेषतः उत्कट प्रेमभावना ज्यांमध्यें व्यक्त झालेली असते, अथवा प्रणयभंगाची दारुण व्यथा ज्यांमध्यें तितक्याच उत्कटतेनें प्रकट झालेली असते, अशा गीतांचें खरें मर्म कवीच्या जीवनांतील अत्यंत खाजगी गोष्टी [illegible] कळल्याशिवाय उकलणें कठीण होतें. कित्येक वेळां [illegible] हें [illegible] कीं [illegible] पराकाष्ठेची आत्मनिष्ठ व व्यक्तिवादी असतात [illegible] उत्कट भावनांनीं [illegible] असतात त्यांतील भावनाहि आपल्या स्वतःच्या [illegible] आपण वस्तुनिष्ठ पद्धतीनें इतरांच्या भावनांचें कौशल्यानें चित्रण केलें आहे असें म्हणण्याइतपत कवींची मजल जाते. यामुळें असल्या भावोत्कट गीतांतील खरी भावना कोणाची—कवीची कीं इतराची ? असे प्रश्न निर्माण होतात आणि टीकाकाराच्या मार्गातील अडचणी दुणावतात. या अडचणींतून बाहेर पडण्याचा एक मार्ग असतो. आणि प्रस्तुत प्रबंधांत मी त्याचाच अवलंब केला आहे. कवीच्या काव्यांत त्याचें जें व्यक्तित्व प्रकट झालें असेल त्याचा सहानुभूतीच्या भावनेनें अभ्यास करून त्या व्यक्तित्वाच्या ज्ञानाच्या आधारावर पुन्हा त्याच्या काव्याकडे

कळावें आणि प्रथम रसोद्ग्राही पद्धतीनें त्याचें समीक्षण करावें. असें समीक्षण पूर्ण झाल्यानंतर मगच आपणांस अभिप्रेत असलेल्या मूल्यांच्या आधारें त्या कवीच्या कवित्वविषयक कामागिरीचें महत्त्वमापन करावें. थोडक्यांत, काव्यांत प्रकट झालेलें कवीचें व्यक्तित्व समजावून घेणें ही महत्त्वाची गोष्ट आहे.

प्रस्तुत प्रबंधांत बालकवींच्या अंतरंगाची ओळख करून घेण्याचें सर्व प्रयत्न मीं केले आहेत असें आपणांस दिसून येईल. त्याचप्रमाणें त्यांच्या व्यक्तित्वांतून स्फुरलेल्या काव्याच्या मर्माचें आकलन होण्यासाठीं ज्या गोष्टी आवश्यक आहेत त्या सर्वांचा उपयोग मी भरपूर करून घेतलेला आहे. बालकवींच्या निसर्गकाव्याचें विश्लेषण करीत असतां मीं शक्य तेथें पाश्चात्य कवींच्या एतद्विषयक कामगिरीचा उपयोग केलेला आहे. आणखी एक गोष्ट अशी कीं, पाश्चात्य राष्ट्रांत जो रोमँटिक संप्रदाय अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत अस्तित्वांत आला त्या संप्रदायांतील जीं वैशिष्ट्यें बालकवींच्या काव्यांत दिसून येतात त्यांचेंहि स्वरूप विस्तारानें वर्णिलें आहे.

अलीकडे मराठींमध्यें निर्माण झालेल्या एका विशिष्ट प्रकारच्या काव्यांत जो कलाहीन ओंगळपणा दिसून येतो त्यामुळें एकंदर आधुनिक कवितेविषयींच आपलें मत वाईट झालें असण्याचा संभव आहे आणि त्याबद्दल मी आपणांस दूषण देणार नाहीं. अशा स्थितींत मागच्या पिढींतील एका निसर्गपूजक व भावनावश कवीच्या काव्याचें अंतरंग व त्याच्या कलेचें स्वरूप या गोष्टी मी आपणासारख्या चिकित्सक व मार्मिक अभ्यासकास जर समजावून देऊं शकलों तर हा प्रबंध लिहितांना मी केलेल्या परिश्रमाचें चीज होईल.

कळावें,

आपला

रा. शं. वाळिंबे

पुणें शहर
८ एप्रिल १९५०

# बालकवि

How bright, how glorious,
The world I see !
The sun how radiant,
How glad the lea !
The buds are thrusting
On branches tall,
And myriad voices
From thickets call.
And joy and rapture
From every breast —
O earth, O sunlight,
O bliss, O zest !

— *Goethe*

# बा ल क वि

## पार्श्वभूमि

१९०७ सालीं जळगांवीं पहिलें महाराष्ट्रकविसंमेलन झालें. या संमेलनानें त्र्यंबक बापूजी ठोंबरे यांना ' बालकवि ' ही पदवी मिळवून दिली. या वेळीं बालकवि सुमारें अठरा वर्षांचे होते. यानंतर दहा वर्षें त्यांनीं कविता लिहिल्या. परंतु ज्यायोगें ' बालकवि ' ही पदवी असार्थ ठरावी असें कांहींहि घडलें नाहीं. ज्या बालत्वसुलभ कुतूहलानें त्यांनीं आपली अगदीं पहिली कविता लिहिली असेल त्या कुतूहलाचा पगडा शेवटपर्यंत त्यांच्या मनावर होता; आणि प्रथम निसर्गाचें वर्णन करीत असतां ज्या अद्वितीय आनंदानें त्यांचें शरीर व मन पुलकित झालें असेल त्याच आनंदानें आयुष्यांतील शेवटचें निसर्गगीत लिहीत असतांनाहि त्यांचें मन मोहरून गेलें असलें पाहिजे यांत कसलीच शंका नाहीं. भोंवतालच्या जगांत प्रत्यहीं घडणाऱ्या अनंत घटना त्यांच्या या बालत्वाला थोडीहि बाधा करूं शकल्या नाहींत.

बालकवींना आपल्या कवित्वाची जाणीव ज्या काळांत झाली त्याच्यापूर्वी सुमारें वीस वर्षें केशवसुतांनीं आपली पहिली कविता लिहिली. या

वीस वर्षांच्या कालखंडांत महाराष्ट्रांत अनेक राजकीय आणि सामाजिक घटना घडून आल्या. राजकीय पारतंत्र्य निकराचा प्रयत्न करून नष्ट करून टाकावें व गेलेलें स्वातंत्र्य पुनरपि प्राप्त करून घ्यावें या ध्येयवादानें प्रेरित होऊन अनेक धीराचे पुरुष या महाराष्ट्रभूमींत तळहातावर शीर घेऊन झगडत होते. अनेकांना कर्झनशाहींतील भयानक कारावासाचे असह्य चटके भोगावयास लागले होते. शिवरामपंत पराजप्यासारख्या प्रभावी लेखणीच्या ध्येयवादी लेखकाला आपलें ज्वलज्जहाल लेखन वक्रोक्तीच्या अवगुंठनानें सौम्य करून दाखविणें भाग पडत होतें. पहिल्या प्लेगच्या अमदानींत झालेल्या भीषण घटनांचें कर्णकटु कवित्व पुढें कित्येक दिवस महाराष्ट्रांतील लोकांच्या कानठळ्या बसवीत होतें. वर्तमानपत्रांचे रकाने महत्त्वाच्या राजकीय घटनांच्या वर्णनानें नेहमींच भरलेले असत. या झाल्या राजकीय क्षेत्रांतील घटना. सामाजिक क्षेत्रांतहि १८८५ पासून इतक्याच प्रभावी व दूरगामी परिणाम करणाऱ्या घटना घडत होत्या. कालांतरानें निरर्थक ठरलेल्या अनेक घातक सामाजिक रूढींविरुद्ध आगरकरांनीं मरेपर्यंत अत्यंत सडेतोडपणें लेखन केलें. समाजांतील शब्दप्रामाण्याचा नायनाट होऊन बुद्धिप्रामाण्याचा विजय व्हावा या उदात्त विचारानें प्रेरित होऊन समाजहितबुद्धीनें आगरकरांनीं मोठ्या धीरानें जें कार्य केलें त्याचेंच पडसाद केशवसुतांच्या अनेक कवितांमधून उमटले. केशवसुतांनीं दंभावर, ढोंगावर, दुष्ट रूढीवर कडाडून हल्ला केला आणि नवीन युगांतील नवीन उदार विचार स्वतः आत्मसात् करून ते समाजाच्या गळीं उतरविण्याचा तेजस्वी प्रयत्न करून पाहिला. केशवसुतांच्या पावलावर पाऊल ठेवून इतर अनेक लेखकांनीं सामाजिक विषमता व अन्याय यांचा प्रतिकार करून नवीन विचार प्रस्थापित करण्याचा आपल्या परीनें प्रामाणिक प्रयत्न करून पाहिला. धर्मविषयक कल्पना व ईश्वरविषयक कल्पना यांच्या बाबतींतहि नवीन विचारसरणी हळू हळू प्रबळ होत होती. प्रार्थनासमाजांत प्रविष्ट झालेल्या बुद्धिमंतांनी या क्षेत्रांत केलेली

कामगिरी मुळींच उपेक्षणीय नाहीं. तात्पर्य, बालकवींच्या काव्यविषयक कर्तबगारीला सुरवात होण्यापूर्वी वीसपंचवीस वर्षे महाराष्ट्रांत फार मोठी वैचारिक क्रांति सुरू झाली होती व त्या क्रांतीचीं विविध स्वरूपें बाल-कवींच्या आसपास आपला अमर्याद प्रभाव दाखवीत होतीं.

## बालकवींची अलिप्तता

आपल्या भोंवतीं घडत असलेल्या या प्रभावी घटनांपासून बालकवि मात्र सर्वस्वीं अलिप्त राहिले. समाजांत केवढी मोठी वैचारिक क्रांति घडत आहे याचा पुसट विचार देखील त्यांच्या मनांत आला नाहीं. आणि कचित् असा विचार त्यांच्या मनांत डोकावला असला तरी तळहातांत रुतलेलें कुसळ जसें तापदायक व्हावें तसा तो विचार बालकवींच्या हळव्या मनाला तापदायक होत असावा. केशवसुतांनीं विशाल मानवतेचें ध्येय आपल्या काव्यांत आविष्कृत केलें, समाजांतील विषमतेचें व अन्यायाचे जे पिढ्यान् पिढ्या बळी होते अशा असंख्य लोकांच्या मुक्या तळमळीला वाचा प्राप्त करून दिली आणि नवीन मानवाचें ध्येयवादी चित्र रंगविलें. रेव्हरंड टिळकांनीं वनवासी फुलाच्या तोंडून मानवी जीवनांतील अनेक विसंगतींचें आविष्करण केलें व त्यांवर टीका केली. दलितांच्या दुर्धर सामाजिक परि-स्थितीविषयीं कळवळा उत्पन्न होऊन त्यांनीं अंत्यजापेक्षांहि नीच होऊन त्याचा उद्धार करण्याची तळमळ बाळगली; वांशिक श्रेष्ठतेचें तत्त्व झुगारून देऊन ब्राह्मण व महार हे दोघेहि मानवच असल्यामुळें त्यांच्या बाबतींत श्रेष्ठ–कनिष्ठतेचा आग्रह धरण्याचें कोणतेंच कारण नाहीं, हें आग्रहानें सांगितलें. परंतु या नवीन विचारसरणीचा प्रभाव या काळांतील दोन कवींवर मुळींच झाला नाहीं. एक बालकवि व दुसरे विनायक. ज्या सामाजिक अन्यायांमुळें केशवसुतांचें अंतःकरण उफाळून आलें व त्यांचा सारा संताप त्यांच्या कवितांतून पुनः पुनः व्यक्त झाला त्या सामाजिक अन्यायांमुळें विनायकांचें कविहृदय यत्किंचित् हललें नाहीं. वर्तमानकाळांत

स्पृहणीय असें कांहीं न दिसल्यामुळें विनायकांचें मन विस्मृतीच्या धुक्यांत गुरफटलेल्या आणि म्हणूनच विशेष आकर्षक भासणाऱ्या भूतकाळांतील रोमांचकारी घटनांमध्यें रमलें; त्या घटनांमध्यें त्यांना सौंदर्याचा साक्षात्कार झाला; त्या रजपूत रमणींच्या रम्योज्ज्वल जीवितांमध्यें त्यांच्या प्रतिभेला निधान लाभलें. अनेक शतकांच्या दूरपणामुळें या साऱ्या घटनांच्या भोंवतीं एक प्रकारचें आकर्षक तेजोवलय निर्माण झालेलें असतें. या तेजोवलयाची विनायकांच्या दृष्टीला भुरळ पडली.गतकाळ फार दूर राहिल्यामुळें त्यांना केवळ नयनमनोहर हिरवळच दिसली; खांचखळगे आणि दऱ्या या गोष्टी त्यांच्या दृष्टीसमोरून जणूं अदृश्य झाल्या. " From the point of yonder rolling cloud I plunge into my past being, and revel there" असें हॅझ्लिट्प्रमाणेंच विनायकहि स्वतःच्या मनाशीं म्हणत असले पाहिजेत.वर्तमानकाळांतील उध्वस्त आणि उदासवाण्या जीवनाचा तिरस्कार आल्यामुळेंच विनायकांनीं आपल्या व्यथित मनाचें समाधान करण्यासाठीं गतकाळांतील सुखद स्मृतीमध्यें स्वतःच्या मनाला गुरफटून टाकलें. दुरून कोठून तरी वाऱ्याच्या मंद झुळुकीबरोबर फुलांचा सुवास यावा किंवा कोठून तरी मधुर आलाप कानांवर यावा आणि त्यायोगें चित्तवृत्ति उल्लसित व्हावी, त्याप्रमाणें विंनायकांचें मन गतकाळांतील घटनांनीं उल्लसित होत असे ही एक प्रकारची गुंगीच होती. या गुंगीमुळें भोंवतालच्या जगांत अगदीं समीप घडणाऱ्या विविध घटनांचें विनायकांच्या दृष्टीनें अस्तित्वच नष्ट झालें.

जो प्रकार विनायकांच्या बाबतींत झाला तोच प्रकार बालकवींच्या बाबतींतहि झाला—आणि अधिक तीव्रपणें झाला. ज्या कालखंडांत बालकवींनीं आपल्या सर्वोत्कृष्ट कविता लिहिल्या त्या कालखंडांत समाजाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत कांहीं महत्त्वाच्या प्रश्नांविषयीं वादविवाद चालले होते. राजकीय क्षेत्रांत प्रतिक्षणीं खळबळ चाललेली होती, परकीय शत्रूमुळें समाजाच्या सर्वांगीण विकासाला पायबंद बसला होता व समाजांतील

अंतर्गत शत्रूमुळें अनेक लोकांचें जीवन असह्य झालेलें होतें आणि त्यांच्या सुखी आयुष्याविषयींच्या साऱ्या आकांक्षांचा चक्काचूर झालेला होता—ही अशी बाह्य परिस्थिति होती. या परिस्थितीचे कांहीं पडसाद बालकवींच्या कवितांत आपल्याला ऐकावयास मिळतील अशी जर आपली कल्पना झाली तर ती मोठी चूक होय. भोंवतालच्या परिस्थितीची बालकवींना माहितीच नव्हती असें कसें म्हणावें ! इतक्या संवेदनाक्षम माणसाला अगदीं नजिक चाललेल्या गोष्टी कळत नव्हत्या असें म्हणणें हास्यास्पद आहे. त्या गोष्टींची त्यांना भरपूर जाणीव होती; पण त्यांच्यामध्यें त्यांचें मन रमत नव्हतें इतकेंच. किंबहुना, या साऱ्या भीषण व दारुण घटनांचा नुसता विचारहि त्यांना तिरस्करणीय वाटत होता. 'यांचा विचारहि करणें नको' हीच त्यांच्या मनाची भावना असली पाहिजे. भोंवतालच्या जगांतील घटनांचें सूक्ष्म अवलोकन करून त्यांचा आविष्कार काव्यात करण्यासाठीं लागणारा कणखरपणाच त्यांच्यांत नव्हता. मानवी जग दुःखाने आणि अनंत असह्य निराशांनीं भरलेलें आहे याचा त्यांना पदोपदीं प्रत्यय येत होता. पण या गोष्टीचा नुसता विचार करणेंहि त्यांना कठिण वाटत होतें. तथापि त्यांचा परिणाम त्यांच्या मनावर होणे अपरिहार्य होतें. त्यांनीं मानवी जीवनांतील दुःखांचें आणि व्यथांचें कांहीं ठिकाणीं वर्णन केलें आहे हें खरें. परंतु भोंवतालच्या घटनांमुळें त्यांच्या स्वतःच्या मनावर जो परिणाम झाला त्याचेंच केवळ आविष्करण करून ते थांबले. वैयक्तिक भावनांचा व व्यथांचा तो आविष्कार आहे. समाजाच्या व्यथांना, तळमळीला, इच्छांना किंवा आकांक्षांना वाचा प्राप्त करून द्यावी हा त्यांचा मुळींच उद्देश नाहीं. बालकवींच्या कवितांत जीं दुःखें आहेत तीं त्यांचीं स्वतःचीं दुःखें आहेत. समाजाच्या दुःखांशीं किंवा त्याच्या इच्छांशीं बालकवींच्या काव्याचा दुरून देखील संबंध आला नाहीं.

## भूतकाळांत रमलेली वृत्ति

आणि यामुळेंच मानवी जीवनाचें ध्येय काय असावें, हें ध्येय

मानवाला प्राप्त करून घेतां यावें यासाठीं कवीनें काय करावयास पाहिजे, भविष्यकाळांत आशा करण्यासारखें कांहीं असूं शकेल काय इत्यादि अनेक गोष्टींविषयीं बालकवि मुग्धच आहेत. वर्तमानकाळ अगदीं तिरस्करणीय आहे, मनाचा कोंडमारा करणाऱ्या अनेक गोष्टी प्रत्यहीं घडत आहेत, व्यक्तीच्या उन्नतीचे सर्व मार्ग कुंठित झाले आहेत, आधिभौतिक किंवा आध्यात्मिक विकासाला प्रतिकूल गोष्टीच पुष्कळ आहेत—हें सारें खरें. पण या पुढच्या काळांत तरी या परिस्थितीत इष्ट ती सुधारणा होण्याची थोडी तरी आशा आहे काय ? आणि खरोखरच अशी आशा असली तर ती सफल करून घेण्याचे कांहीं उपाय आहेत काय ? इत्यादि सर्व प्रश्नांविषयीं बालकवि पूर्ण उदासीन आहेत. भविष्याविषयीं आशादायक स्वप्नें त्यांना कधींच पडलीं नाहींत. यामुळे

The trumpet of a prophecy, O wind,
If Winter comes, can Spring be far behind ?

असा कणखर आशावाद शैलीप्रमाणे प्रकट करणें त्यांना जमलें नाहीं. वर्तमानांत कांहीं समाधान नाहीं आणि भविष्याविषयीं कसलाच आशावाद नाहीं अशी बालकवींच्या मनाची स्थिति आहे. राहतां राहिला भूतकाळ ! आणि या भूतकाळांतील दृश्यांशीं आणि घटनांशीं ते पूर्ण समरस झाले. त्यांना ' वीर मराठा ' कुमार दिसला, ' जीर्ण दुर्ग ' दिसला आणि दौलतरावांची राजस मंजुळा दिसली !

भूतकालाच्या धुक्याआड दडलेल्या जुन्या दुर्गांची, पराक्रमी वीरांची आणि राजस रमणींचीं चित्रें पाहिल्यामुळें वर्तमानकाळांतील अनेक व्यथांनीं गांजलेल्या त्यांच्या हळव्या मनाला विलक्षण विरंगुळा मिळाला असला पाहिजे. पण आपल्या तप्त मनाला रिझविण्यासाठीं त्यांनीं आणखी दोन गोष्टींचा आधार घेतला. आणि हाच आधार त्यांच्या खचूं पाहणाऱ्या मनाला धीर देऊं शकला.प्रेम आणि सौंदर्य या त्या गोष्टी होत. या गोष्टींचा आत्यंतिक प्रभाव सर्व आयुष्यभर बालकवींच्या मनावर होता. तो कधींहि

थोडासुद्धां कमी झाला नाहीं. किंबहुना वयाबरोबर तो वाढतच गेला असें म्हटलें तरी चालेल. प्रेम आणि सौंदर्य या दोनच गोष्टींत त्यांच्या साऱ्या चित्तवृत्तींचा परिपूर्ण लय झालेला आहे.

* * *

## संशयवादानें संभ्रांत झालेलें मन

धर्म, ईश्वर, नीति इत्यादि कल्पनांविषयीं त्यांच्या मनांत कधींच विचार आले नाहींत असें म्हणतां यावयाचें नाही. क्वचित् हे विचार त्यांच्या मनांत येत असत, हें अगदीं खरें. इतकेंच नव्हे तर त्यांच्या स्वरूपाविषयीं समाधानकारक उत्तर त्यांच्या मनाला न मिळाल्यामुळें अनेक प्रकारच्या संदेहांनीं त्यांचें मन मधूनमधून व्याकुळहि होत असे. ‘ कवीची इच्छा ’ या कवितेंत या प्रकारच्या अनेक संदेहांची मालिकाच आहे. सत्याचें खरें स्वरूप कोणतें ? सत्य हें एक स्वप्नच आहे काय ? सत्यच स्वप्नांचा आभास निर्माण करतें काय ? सत्य हेंच स्वप्न असलें तर मानवी जग हें त्या स्वप्नांतलें स्वप्न आहे असें म्हणावें काय ? जीवित हें जर स्वप्न असेल तर मरण हेंहि स्वप्नच आहे काय ? कीं जीवित आणि मरण या दोन्ही गोष्टी स्वप्नमय नसून सत्य आहेत ? इत्यादि संशय-मालिकेने बालकवींचें मन अक्षरशः संभ्रांत झालेलें आहे हें स्पष्ट दिसतें. धर्माविषयींसुद्धां त्यांचें मन व त्यांची बुद्धि यांच्यामध्यें असाच कलह चाललेला आहे. ‘ हृदयाची गुंतागुंत ’ या कवितेंत ते म्हणतात—

हे धर्म सांगती भिन्न भिन्न पथ कांहीं
मम वृत्ति सांगती भिन्न तुझा पथ पाहीं.
ही बुद्धि सांगतां मन ऐकें ना तीतें
हें चित्त वदे तें पटेच ना बुद्धीतें
द्वैताची असली अक्षय झोंबी चाले.

या कवितेमध्यें बालकवींचा संशयवाद पराकोटीला गेलेला आहे. स्वार्थ चांगला कीं परमार्थ चांगला ? वैराग्य बरें कीं प्रेम बरें ? कर्म श्रेयस्कर कीं कर्मत्याग श्रेयस्कर ? श्रद्धा चांगली कीं संशय चांगला ? असला विलक्षण 'व्यामोह' कवीला झाला आहे. मृत्यु समीप आल्यावर आपल्याला सोबत कोण करील ? ज्या ईश्वराचें जन्मभर भक्तीनें स्तवन केलें तो ईश्वर मृत्युसमयीं मदतीला धावून येईल काय ? हाहि विचार त्यांना त्रस्त करीत आहे 'संशय' या कवितेंत ते म्हणतात—

अज्ञानें परि वाहिलें निजमनीं ज्या ईश्वरालागुनी
साह्या त्या समयास तो तरि अहो येईल कां धावुनी ?

## ज्ञानाचें वैयर्थ्य

सत्य, धर्म, ईश्वर इत्यादि गोष्टींविषयी बालकवींच्या मनांत विचाराचें असलें विलक्षण काहूर माजलें आहे. मग ज्ञान, प्रेम, आनंद इत्यादि गोष्टींविषयीं अनेक संशय त्यांच्या मनांत थैमान घालीत असले तर त्यांत नवल काय ? 'खराखुरा आनंद असे कीं सर्वच आभास ?' असा केविलवाणा प्रश्न ते 'जिज्ञासु' या कवितेंत विचारीत आहेत. ज्या ज्ञानाच्या आधारानें विश्वांतील अनेक गूढें उकलता येण्याची शक्यता आहे त्या ज्ञानाच्या सामर्थ्याविषयींच त्यांच्या मनांत जबरदस्त शंका निर्माण झाली आहे असें दिसतें. मानव परमेश्वराची उपासना करीत असतांहि इतका दुःखी कां ? या प्रश्नाचें उत्तर शोधून काढण्यासाटीं ज्ञानाचा आश्रय घ्यावा म्हटलें तर चित्तापुढें केवळ कांहीं भास तरळून जातात अशी त्यांची तक्रार आहे. ज्ञानाचें वैयर्थ्य अशा प्रकारें चित्ताला पटल्यावर अज्ञात गोष्टींचा उलगडा कसा व्हावा ? शेवटीं प्रत्यक्ष ज्ञानच अज्ञान आहे असें त्यांना वाटूं लागतें. 'हृदयाची गुंतागुंत' या कवितेंत याविषयीं त्यांचे उद्गार पहा—

हें ज्ञान मला तर अज्ञानापरि भासें
मी सोडवितां तें उलटे बांधी फासे
मन विटलें, विटली शब्दचिकित्सा सारी
मी फिरतां गरगर बुद्धि तयामाझारीं.

ज्ञानाच्या मदतीनें तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतील अनेक गहन प्रश्नांचें आकलन करून घेण्याची आकांक्षा प्रत्यक्ष ज्ञानाच्याच वैयर्थ्यामुळें अशा प्रकारें फोल ठरली आहे. अशा स्थितींत अज्ञेयाचीं किंवा 'गूढ अमूर्तां'चीं गुपितें कशीं कळावीं ? यासाठीं कवीनें 'दिव्य विचारा'ची विनवणी केली आहे. सृष्टीचें कोडें उकलत नाहीं, 'तेजोमार्गा'वर चित्त वळत नाहीं, म्हणून त्याचें मन दिव्य विचाराला उद्विग्नपणे हांक मारीत आहे. 'कवीचा विचार ' या कवितेंत कवीच्या मनाचा आर्तपणा प्रकट झाला आहे.

सृष्टीचा मनिं भाव कळेना । तेजोमार्गी चित्त वळेना
म्हणुनि असें उद्विग्नपणें तें । हांक मारितें अखंड तूंतें.

या दिव्य विचाराचें उगमस्थान कोणतें याचेंहि उत्तर बालकवीच्या मनाला मिळत नाहीं. रम्य उषेच्या पहिल्या किरणांत तो आढळेल ? कीं रजनीच्या गंभीर गानांत तो आढळेल ? किंवा मातेच्या उच्छ्वासांत, अथवा सात्त्विक कांतेच्या करपाशांत, अथवा लहानग्याच्या मृदुल हास्यांत आढळेल ? कवीला या प्रश्नांचें निश्चित उत्तर मिळत नाहीं. यामुळें ही ' तत्त्वशास्त्राची भूलभुलाई ' नको असेंच त्याला वाटूं लागतें. ' सौख्यहि शिणलें, दुःखहि शिणलें, शिणले तत्त्वविचार ' असा उद्विग्न मनाचा उद्गार 'आवाहन' या कवितेंत आढळतो. तत्त्वज्ञान अंतिम सत्याचा शोध लावून मनाला समाधान प्राप्त करून देतें हेंच मुळीं कवीच्या हृदयाला पटत नाहीं. किंबहुना ज्ञानामुळें मानवी जीवनांत एक प्रकारची विचित्र संशयग्रस्ततेचीच अवस्था निर्माण होत असेल तर त्या ज्ञानाचा हव्यास बाळगाच कशाला, अज्ञानच बरें नाहीं का, इत्यादि विचार कवीच्या मनांत डोकावूं लागतात.

तत्त्वज्ञानाच्या रूक्ष विचारामुळें मानवी जीवनांतील सारें सौंदर्य वितळून जातें अशी तक्रार कीट्‌सनें केलेली नाहीं काय ?

Do not all charms fly
At the mere touch of cold philosophy ?

असा मार्मिक प्रश्न विचारून कीट्‌स पुढें म्हणतो—

Philosophy will clip an angel's wings. ¶

कीट्‌सप्रमाणेंच बालकवींच्याहि मनाची अवस्था झालेली आहे. ज्ञानाची उपासना करून शेवटीं जर निराशाच पदरीं पडावयाची असेल आणि विश्वांतील अनेक गूढें जर अधिकच गूढ व्हावयाचीं असतील तर अशे-याच्या भव्य महाद्वारावर व्यर्थ डोकें आपटून घेण्यांत काय मतलब आहे हें त्यांना कळत नाहीं. ‘ हृदयाची गुंतागुंत ’ या कवितेंत हा विचार स्पष्ट झाला आहे.

मम रुचे न किमपी व्यापकता गगनाची
ती अमर्यादता आचिंत्य गूढ दिशांची
ही अगाधता कीं सर्वंकष कालाची !
हें दिसून सर्वहि मज न दिसेसें होई.

ज्ञानोपासनेचा विश्वाचीं गूढें उकलण्याच्या बाबतींत कांहींहि उपयोग नसल्यामुळें व तिच्यामुळें मनांतील संशयांचा निरास होण्याऐवजीं ते वाढतच जात असल्यामुळें ‘ नको तें ज्ञान ’ असें कवि उद्विग्नतेनें म्हणतो. मग कवीला हवें तरी काय ?—

सौंदर्य फुलांचें, गाणीं वनविहगांचीं
ती गोड शांतता हिरव्या वृक्षलतांची
शीतलता सुंदर चंचल निर्झरणींची
गंभीरपणाची मूर्ती गिरिरायाची.

---

¶ *Lamia, part II lines 229–30 and 234*

मानवी जगतांत ज्ञानाच्या क्षेत्रांत संशय कधींच नष्ट होत नसतात. पण यामुळें ज्ञानच नको असें म्हणून विचारी माणसें या प्रश्नांपासून अलिप्त राहतात असें मुळींच होत नाहीं. पण संशयवाद हळव्या मनाला न झेपल्यामुळें ज्ञानच नको असें म्हणून बालकवि अलिप्ततेची वृत्ति स्वीकारतात व निसर्गांतील विविध रमणीय दृश्यांमध्यें विरंगुळा मिळवूं पाहतात. इंग्रजींत ज्या वृत्तीला escape ही संज्ञा आहे तीच ही वृत्ति होय.

## विषण्णतेची छाया

जगतांतून मनाने दूर कोठें तरी निघून जाण्याची ही वृत्ति बालकवीं-मध्यें प्रबळ होण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण आहे. आपण दुःखांनीं भरलेल्या जगांत नांदत आहोंत ही बालकवींना सतत जाणीव आहे. मानवी जीवनांत अनेक प्रकारच्या उणीवा असून तें कधींच परिपूर्ण होऊं शकणार नाहीं हें शल्यहि त्यांच्या हृदयांत रुतून बसलेलें आहे. या दृढमूल झालेल्या विचारामुळें त्यांच्या मनाला विषण्णता जाळीत आहे. ही विषण्णतेची भावना अनेक ठिकाणीं त्यांनीं स्पष्टपणें प्रकट केली आहे. मानवी जग हें पराकाष्ठेचें स्वार्थी असून या स्वार्थापायीं अनेक दीनदुबळ्यांचे हाल होतात. ‘ स्वार्थाच्या बाजारांत, किती पामरें रडतात, ’ असें कवि ‘ आनंदी आनंद ’ या कवितेंत म्हणत आहे. या मर्त्य जगांत दुःखांचे भयानक डोह असल्यामुळें जीवाला समाधान व शांतता या गोष्टी दुर्लभ आहेत; यामुळें या क्षुद्र देहाची आसक्ति धरावीशी वाटत नाहीं. हा विचार कवीनें अनेक ठिकाणीं व्यक्त केला आहे. मानवी जीवितार्चे हें दुःखपूर्ण स्वरूप पाहिल्या-वर बालकवींसारख्या पराकाष्ठेच्या भावनावश व हळुवार मनाच्या कवीला उदासीनतेनें हैराण करून टाकलें असल्यास त्यांत नवल नाहीं. खिन्नपणा आपल्या निराश हृदयाला क्षणभरहि सोडीत नाहीं असें त्यांनीं पुनः पुनः केविलवाणेपणानें म्हटलें आहे. ‘ निराशा ’ या कवितेंत आपल्या निराश-मनाचें कवीनें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे—

सुंदर सगळें, मोहक सगळें
खिन्नपणा परि मनिंचा न गळे,
नुसती हुरहुर होय जिवाला—कां न कळे कांही !

हृदयांत ‘ नैराश्यकालिमा ’ दाटलेला आहे व या नैराश्यामुळें ‘ जीवित केवळ करुणासंकुल ’ झालें आहे असे आर्त उद्गार काढणारा कवि भोंवतालच्या दारुण, दुःखपूर्ण घटनांना टक्कर देऊन त्यांच्यावर मात करावयास असमर्थ ठरलेला आहे हें उघड आहे. ही अमर्याद विषण्णता येण्यास पुष्कळ कारणें झालीं असलीं पाहिजेत. जगातील अनंत दुःखें, क्षुद्र स्वार्थ, तिरस्करणीय संकुचितपणा, आपल्या आकांक्षांचा प्रत्यहीं होणारा चुराडा हीं कारणें बालकवींच्या औदासीन्याच्या मुळाशीं आहेत यांत मुळींच शंका नाहीं. पण आणखीहि कारणें आहेत. आपलें मानवी जीवित अत्यंत अशाश्वत आहे ही गोष्ट कवीच्या मनाला विलक्षण टोंचणी देत आहे. या जगांत कोणतीच मानवी गोष्ट स्थिर नाहीं, प्रेम स्थिर नाहीं, सौंदर्य स्थिर नाहीं, वैभव स्थिर नाहीं !

प्रीतीचा पथ हा भयाकुल दिसे सौंदर्यसौदामिनी
डोळ्यांना क्षण तेज दाखवुनिया अस्तंगता हो क्षणीं.

सौंदर्य हें विद्युल्लतेप्रमाणें क्षणभर दिसतें आणि लगेच नष्ट होतें; आयुष्यहि असेंच भराभर निघून जात आहे; उद्यां काय होईल तें सांगवत नाहीं; अशा स्थितींत कशाचा विश्वास धरावा ? उद्यांचा दिवस कसा उगवणार आहे कोणास ठाऊक ? तो सुखपुष्पांची परडी घेऊन येणार आहे कीं दुःखविषाचा प्याला घेऊन येणार आहे ? आज वैभव आहे हें खरें; पण तें स्थिर राहील कशावरून ? अनुभव असें सांगतो कीं तें स्थिर राहत नाहीं. आजचा दिवस चांगला असला तरी उद्यां काय होणार या विचारानें सुखी मनुष्य व्यथित होतो. मग ज्याला आज दुःखच भोगावें लागत आहे अशा माणसानें उद्यांच्या सुखाकडे आशेनें व केविलवाणेपणानें

पाहत बसणें हास्यास्पद ठरणार नाहीं काय ? वर्तमानकाळ स्पृहणीय नाहीं व भविष्यकाळाच्या चांगुलपणाची खात्री नाहीं. आणि गतकाळ—! गतकाळाचें चिंतनहि तापदायकच ! तो सुखकारक असला तर तीं पूर्वीचीं सुखें पुन्हा प्राप्त होत नाहींत म्हणून वेदना आणि दुःखकारक असला तर तीं दुःखें नाहींशीं करून सुख मिळविणें आपल्याला शक्य झालें नाहीं या दौर्बल्याच्या जाणिवेनें वेदना ! तात्पर्य, वेदनांशिवाय मानवी जीवनांत दुसरें कांहींच नसल्यामुळे औदासीन्याची झापड चित्तावर पडूं नये तर दुसरें काय व्हावें ? स्वतः कवीला या औदासीन्याचें कारण कांहीं वेळां समजत नाहीं हें स्वाभाविकच आहे. अनेक व्यथांमुळें विक्लव झालेल्या चित्ताला एक प्रकारची बधिरता येत असते आणि अशी बधिरता आली म्हणजे कार्यकारणभावच कळेनासा होतो. ‘ उदासीनता ’ या कवितेमध्यें कवि म्हणतो—

कोठुनि येते मला कळेना
उदासीनता ही हृदयाला ?
काय बोंचतें तें समजेना
हृदयाच्या अंतर्हृदयाला.
एथे नाही तेथें नाही
काय पाहिजे मिळवायाला ?
कुणीकडे हा झुकतो वारा ?
हाका मारी जीव कुणाला ?
मुक्या मनाचे मुके बोल हें;
घरें पाडिती पण हृदयाला !
तीव्र वेदना करिती; पण ती
दिव्य औषधी कसली त्याला ?

‘ शून्य मनाच्या घुमटांत ’ कसले बोल उमटत आहेत ? त्यांचा अर्थच कवीला कळेनासा झाला आहे. सुस्कारे सोडणें येवढें एकच कार्य आतां

उरलें आहे. ‘ खोल मनांतिल खोल ’ असे बोल कोण ऐकून घेणार ? दिवसांसुद्धां भयाण काळोख कवीच्या डोळ्यांवर झांपड बसवीत आहे; अनंत दुःखांमुळें ‘संशयकाहूर’ हृदयामध्यें दाटलें असून ‘स्वास्थ्य क्षणभर नाहीं—’ इत्यादि जे आर्त विचार ‘ रजनीस आव्हान ’ या कवितेंत प्रकट झाले आहेत ते विचार म्हणजे कवीच्या नैराश्यपूर्ण जीवनाचें भाष्यच होत.

या औदासीन्याचा कांहीं वेळां इतका अतिरेक होतो कीं, कवीला मरणाची ओढ लागते. ‘ काळास ’ या कवितेंत आपल्या या विमनस्कतेचें स्वरूप कवीनें अगदीं स्पष्टपणें वर्णिलें आहे. मन शून्य झालें आहे, खिन्न-पणा आला आहे, अंधकार सुखद वाटत आहे, निद्रा पळून गेली आहे, अंतःकरण जळत आहे, अशा स्थितींत या भीषण गोष्टींचा विसर पडला तर काय बहार होईल ! शांतता लाभण्यासाठीं काय करावें ? काळोखांत तोंड खुपसून बसावें काय ? परमेश्वर दया करून मनाला हें स्वास्थ्य देईल काय ? इत्यादि विचारांनीं कवीचें मन अगदीं दडपून गेलें आहे.

शेवटीं नैराश्याची भावना पराकाष्ठेची बळावल्यावर कवीनें मृत्यूचें आवाहन पुढील कारुण्यपूर्ण शब्दांत केलें आहे—

ये काळा, ध्यान तुझें मात्र लागलें !

आपल्या असंख्य यातनांतून मुक्त होण्याचा विस्मरण हा एकच मार्ग आहे असें कवीला दिसून आलें आहे. पण हें विस्मरण व्हावें कसें ? ज्या ठिकाणीं विस्मरण शक्य आहे अशा ठिकाणी वाऱ्यानें आपल्याला घेऊन जावें अशी इच्छा व्यक्त करून कवि काळाला म्हणतो—

विस्मृतिमाधिं बुडावि जीव तव हृदयीं हृदय ठेव.

दुःखाचा विसर पडणें अर्थातच शक्य नसल्यामुळें भोंवतालच्या जीवनांतून मनानें पलायन करून कलेची स्वतंत्र कल्पनासृष्टि निर्माण करणें कवीला भाग पडलें आहे हें स्पष्ट दिसतें.

## निसर्गाकडे धाव

आणि जो आनंद मानवी जगांतील दुःखपूर्ण व नैराश्यजनक वातावरणांत कवीला प्राप्त करून घेतां येणें शक्य झालें नाहीं तो आनंद प्राप्त करून घेण्यासाठीं आणि जें निरागस, दिव्य व शाश्वत सौंदर्य मानवांमध्यें त्याला दिसले नाहीं त्या सौंदर्याचा साक्षात्कार व्हावा म्हणून कवीनें निसर्गाशीं तद्रूप होऊन त्याच्यावर भक्ति करण्यास सुरवात केली यांत शंका नाहीं. याचा अर्थ असा नाहीं कीं, निसर्गाशीं तादात्म्य पावल्यावर कवीची विषण्णता अजिबात नष्ट झाली. निसर्गाच्या दिव्य सहवासांत निर्मळ आनंदाचे कांहीं क्षण त्याला लाभले हें खरें असलें तरी विमनस्कता ही मधूनमधून डोकावतच आहे. निसर्गाच्या सौंदर्यामुळें त्याचें मन उल्लसित होई व तो सहवास संपला कीं विमनस्कता पुन्हा बळावूं लागे. निसर्गाच्या सान्निध्यांत आपल्या दुःखपूर्ण आयुष्याचा व नैराश्याचा त्याला विसर पडत असे इतकाच याचा अर्थ आहे. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, आपल्या नैराश्यपूर्ण वातावरणाचा विसर पडावा म्हणून कवि निसर्गाकडे धाव घेत असे व त्याच्या सौंदर्याची अमृतवृष्टि झाली म्हणजे तो धन्य होत असे.

जगतांतील दुःखांचा व सर्व प्रकारच्या अस्थिरतेचा उबग झाल्यामुळें त्यांचा क्षणभर विसर पडून मनाला विरंगुळा वाटावा यासाठीं निसर्गाकडे धाव घेण्याचे बालकवींच्या मनांत कां व कसें आलें हें समजण्यासाठीं बालकवींचाच समानशील मित्र जो कीट्स त्याच्या Ode to a Nightingale या प्रसिद्ध कवितेंतील पुढील ओळी पहाव्या.

Fade far away, dissolve, and quite forget
What thou among the leaves hast never known,
The weariness, the fever, and the fret
Here, where men sit and hear each other groan;
Where palsy shakes a few, sad, last gray hairs,

Where youth grows pale, and spectre-thin and dies;
Where but to think is to be full of sorrow
And leaden--eyed despairs;
Where Beauty cannot keep her lustrous eyes;
Or new Love pine at them beyond tomorrow.

मानवी जगतांतील या दुःखपूर्ण घटनांमुळें पराकाष्ठेचें औदासीन्य उत्पन्न झाल्यामुळें आपल्या जीविताचा अंत झालेला बरा असा विषण्ण विचार कीट्सच्या मनांत प्रादुर्भूत झाला.

and, for many a time
I have been half in love with easeful Death,
Call'd him soft names in many a muse'd rhyme,
To take into the air my quiet breath;
Now more than ever seems it rich to die—

कीट्सला ज्या कारणांमुळें विलक्षण औदासीन्यानें घेरले होतें व ज्या कारणांमुळें त्याला मृत्यूचा ध्यास लागला होता त्याच कारणांमुळें बालकवींनाहि औदासीन्यानें घेरलेले आहे व त्याच कारणांमुळें ते विस्मृतीची इच्छा करीत आहेत व मृत्यूचें ध्यान करीत आहेत.

या दारुण यातनांतून मुक्त होण्याच्या लालसेनेंच बालकवि निसर्गाच्या आनंदमय व सौंदर्यमय वातावरणांत राहूं इच्छितात !

## निसर्ग व मानवी जीवन यांतील विरोध

निसर्गाशीं तादात्म्य पावून बाह्य जगाला विसरण्याची बालकवींना इतकी उत्कंठा कां लागली होती याची कारणें आपण पाहिलीं. पण या बाबतीत एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे. ती अशी कीं सुरवातीला बालकवींनीं जीं निसर्गगीतें लिहिलीं तीं लिहीत असतां जगतांतील दुःखांचा उबग हें कारण कदाचित् तितकेसें प्रभावी नसेल. निसर्गसौंदर्यात रममाण होण्याची त्यांची प्रवृत्तीच असेल. परंतु जगांतील दुःखाची जाणीव

तीव्रतेनें होऊं लागल्यावर मग बाह्य परिस्थितीचा विसर पडावा अशी त्यांना अधिकाधिक तळमळ लागूं लागली; आणि मनाला विरंगुळा मिळावा म्हणून ते निसर्गांत जास्त तन्मय होऊं लागले. या तन्मयतेमुळे त्या वेळेपुरती तरी दुःखांची जाणीव ते विसरून जात. परंतु पुन्हा मानसिक अस्वस्थता वाढूं लागे, विषण्णतेची घनदाट छाया दाटूं लागे आणि त्या मनःस्थितींत ते औदासीन्याच्या तीव्र व्यथांचें परिणामकारक वर्णन करीत; आणि त्या व्यथांचा विसर पडावा म्हणून ते पुन्हा निसर्गाकडे धाव घेत. 'क्षणांत येतें सरसर शिरवे, क्षणांत फिरुनी ऊन पडे ' या बालकवींच्याच ओळींत वर्णिल्याप्रमाणें त्यांच्या आयुष्यांत ऊनपावसांचा हा पाठशिवणीचा खेळ एकसारखा चाललेला होता. निसर्गांतील अद्वितीय, दिव्य सौंदर्याचा साक्षात्कार होण्याच्या क्षणीं त्यांचें हृदय आनंदानें परिपूर्ण होई; पण व्यावहारिक जगांतील दुःखांच्या धगीनें त्यांचें मन लगेच करपून जाई. पुन्हा निसर्गसान्निध्यानें त्यांच्यावर अमृतवृष्टि होई.

निसर्गाच्या निकट सान्निध्यांत जाऊन बालकवि त्याच्याशीं तादात्म्य पावण्याचा प्रयत्न करूं लागले म्हणजे निसर्ग व मानवी जीवन यांमधील आत्यंतिक विरोधाची जाणीव त्यांना फार तीव्रतेनें होत असे. मानवी जीवन क्षणभंगुर आहे, मानवाच्या भावनांना कसलीच स्थिरता नाहीं, वैभवहि चंचल आहे. मानवी जीवनांत कोणती गोष्ट स्थिर असेल तर दुःख ही ती गोष्ट होय. आपलें सुख हें नेहमीं दुःखानें डागळलेलें असतें. तारुण्य ही चीज तर भारीच क्षणिक. मृत्यूची झडप केव्हां पडेल याचा नेम नाहीं. अशा स्थितींत सुखाच्या कांचनमृगामागें सैरावैरा धावण्यांतच मानवाचें सारें सामर्थ्य लयाला जातें. टेनिसन् म्हणतो—

Death is the end of life; ah why
Should life all labour be ?
Let us alone. Time driveth onward fast,
And in a little while our lips are dumb. $

$ *The Lotus-Eaters*

परंतु निसर्गाच्या ठायीं हें चांचल्य, ही अस्थिरता नाहीं. राज्यें उध्वस्त होतात, प्रचंड उलथापालथी होतात, पराक्रमी वीर वैभवाच्या शिखरावर चढतात व अस्तंगत होतात—पण निसर्ग मात्र स्थिर असतो. त्याचें वैभव लयाला जात नाही; त्याच्या ठिकाणी ओतप्रोत भरलेलें सौंदर्य काळानें बाधित होऊं शकत नाहीं, त्याचें आनंदमय स्वरूप अविनाशी आहे. निसर्गाचे सामर्थ्य अमर्याद असून त्याचा दिमाख कधींच कमी होत नाही.

सृष्टि व मानव याच्यामधील हा आत्यंतिक विरोध बालकवींना तीव्रपणें जाणवलेला आहे. या विरोधाच्या जाणिवेनें खिन्नता निर्माण होणें अगदीं अपरिहार्य आहे पण त्याला इलाज नाहीं. ही विरोधाची जाणीव बालकवींनीं अनेक ठिकाणी प्रकट केली आहे. निर्झराचें गीत स्वर्गीय असून असलें दिव्य गीत मला कधींच गातां येणें शक्य नाहीं असें ते निराश होऊन म्हणतात. दिक्कालांच्या बंधनांनीं जखडलेल्या मानवी जीवाला दिव्य जीवित प्राप्त होणें शक्य नसल्यामुळें दिव्य गीतांनाहि तो पारखा असणारच !

परि न झरे माझ्या गानी दिव्याची असली श्रेणी !
जडतेला खिळुनी राही हृदयबंध उकलत नाहीं !
दिव्यरसी विरणें जीव जीवित हे याचें नांव,
ते जीवित न मिळे मातें मग कुठुनी असली गीतें ! ‡

मानवी जीवन अनेक दृष्टींनी अपूर्ण आहे याचें शल्य बालकवींना बोंचत आहे. आकाशात भरारणाऱ्या पांखराप्रमाणें आपलें चित्त ‘ तरळ ’ व्हावें अशी त्यांची इच्छा आहे. पण स्वतःची अपूर्णता त्यांना शोकपूर्ण करीत आहे. चैतन्यासाठी जावयास जीव उत्सुक झाला आहे पण देहाची गांठ सुटत नाहीं. § अनंत भवदुःखांमुळें जीवाला क्षणभरहि विसावा नाहीं. असल्या या क्षुद्र मानवी जीवानें खगबाळांप्रमाणें स्वैरसंचार करण्याची

‡ निर्झरास § अष्टदिशांचा गोफ

महत्त्वाकांक्षा बाळगण्यांत काय मतलब ? पक्ष्याच्या रमणीय जीवनांतील व स्वतःच्या अपूर्ण जीवनांतील विरोध 'अष्टदिशांचा गोफ' कवीनें पुढीलप्रमाणें वर्णिला आहे—

अपूर्णताही यापरि मजला जरि बुडवी शोकीं
चित्र मनोहर खगवाला परि मी तव अवलोकीं.
अपूर्ण अपुलें ईप्सित झालें पूर्ण दिसे जेथें
मनुजाचें मन सहज पावतें आकर्षण तेथें.

मानवी जीवितांतील अस्थिरता व सृष्टींतील स्थैर्य यांमधील विलक्षण विरोध कवीनें 'प्रीति व कर्तव्य' या कवितेंत आणखी एकदां वर्णिला आहे. मानवी सौंदर्य हे विजेप्रमाणें चंचल आहे आणि प्रीतीच्या बाबतींतहि तेंच खरें आहे. परंतु निसर्गाकडे पहावें तर—

वर्षी हा ग्रहगोल शांत वरती हा चंद्रमा मंगल
तैसें नील गभीर हें गगनही निश्चित उर्वीतल
पाहोनी असला विरोध जगतीं चिद्वृत्ति हो घाबरी.

तात्पर्य, मानवी जीवनाची अपूर्णता, दुःखमयता, विरूपता या गोष्टी कवीच्या मनाला सहन झाल्या नाहीत. आणि उलट निसर्गांत त्याला स्थैर्य, परिपूर्णता, सौंदर्य व आनंद या गोष्टी दिसल्यामुळें मानवी जीवनाकडे पाठ फिरवून सौंदर्य व आनंद यांच्या प्राप्तीसाठीं त्याला निसर्गाची उपासना करणें भाग पडलें आहे.

## सौंदर्यशोधासाठींच निसर्गाशीं तादात्म्य

सौंदर्याचा शोध करण्यासाठींच निसर्गाशीं तन्मय होण्याचें बालकवीनें ठरविलें आहे. सौंदर्याचा साक्षात्कार हेंच त्यांच्या जीवितांचें एकमेव ध्येय आहे. सृष्टीचें रमणीय स्वरूप या सौंदर्याचा साक्षात्कार त्यांना झालेला आहे. सृष्टीचें स्वरूप आनंदमय आहे. सृष्टींत सर्वत्र आनंद कोंदून भरलेला आहे. सृष्टींतील या आनंदाचा उद्रेक आपल्या मनांत शिरला म्हणजे तें पराकाष्ठेचें उल्लसित होतें आणि मनाची अशी आनंदपूर्ण उल्लसित अवस्था झाली म्हणजे

सृष्टींत सर्वत्र भरलेल्या दिव्य सौंदर्याचा खरा साक्षात्कार होतो. सृष्टींत ज्याप्रमाणें सर्वत्र आनंद व सौंदर्य या गोष्टी ओतप्रोत भरलेल्या आहेत त्याप्रमाणेंच प्रेमहि सर्वत्र भरलेले आहे. किंवा असेहि म्हणतां येईल कीं, सौंदर्य हेंच एक मूलतत्त्व असून आनंद व प्रेम ही त्याची वेगळीं स्वरूपे आहेत. या सौंदर्यतत्त्वाचाच बालकवींना ध्यास लागलेला आहे. A thing of beauty is a joy forever * असें कीट्सप्रमाणें बालकवींनाहि वाटत आहे. प्रत्येक क्षणाला नवीन आकर्षकपणा धारण करणें हे तर सौंदर्याचें वैशिष्टय आहे. असल्या या सौंदर्याचा साक्षात्कार व्हावा ही बालकवींची तळमळ आहे. या एका गोष्टीखेरीज दुसऱ्या कशांतहि त्यांना आसक्ति वाटत नाहीं. हें सौंदर्य केवळ निसर्गाच्या विविध स्वरूपांतच आढळेल अशी खात्री झाल्यामुळें बालकवींनीं निसर्गाशीं तद्रूप होण्याचें ठरविलें. सौंदर्य म्हणजे सत्य आणि सत्य म्हणजेच सौंदर्य—' Beauty is truth, truth beauty' असें कीट्सनें म्हटलें आहे. $ ज्या ठिकाणीं सौंदर्याचें अधिष्ठान आहे त्याच ठिकाणीं मानवजातीच्या उद्धाराचें साधन आढळेल, तेथेंच सत्याचा साक्षात्कार होईल—" My world is disenchanted. Where shall I find loveliness ? Where does Beauty sleep ? *There* is the healing of humanity, there is truth " असें विल्यम मॉरिस म्हणतो. बालकवींनीं प्रत्यक्षपणें सौंदर्य व सत्य या गोष्टी एकरूपच आहेत असें म्हटलेलें नाहीं. तथापि सौंदर्य आणि प्रेम या गोष्टी ते अभिन्न मानीत आहेत. या दोन तत्त्वांच्या जोडीला आनंद हें तत्त्व मानलें म्हणजे सौंदर्य—प्रेम—आनंद ही बालकवींची त्रिपुटी तयार झाली.

सृष्टींत सर्वत्र आनंद भरलेला आहे हा विचार बालकवींनीं अनेक वेळां

---

* *Endymion*

$ *Ode on a Grecian Urn*

*' Beauty is truth, truth beauty '—that is all*
*Ye know on earth, and all ye need to know.*

सांगितला आहे. ' आनंदी आनंद ' या कवितेंत या आनंदाची व्यापकता वर्णिली आहे.

आनंदी आनंद गडे !
इकडे तिकडे चोहिंकडे
वरतीं खालीं मोद भरे
वायूसंगें मोद–भरें;
नभांत भरला
दिशांत फिरला,
जगांत उरला,
मोद विहरतो चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

ही कविता बालकवींनीं वयाच्या विसाव्या वर्षी लिहिलेली आहे. याचा अर्थ, अल्लड वयांतील ही कल्पना आहे. आणखी कांहीं दिवस त्यांना सृष्टीच्या स्वरूपात सर्वत्र आनंदोद्रेकच दिसत आहे. आकाशातील 'नाचरा' आनंदोद्रेक पाहून पर्वत जणूं समाधिस्थ झाला आहे, अशी कल्पना ' अष्टदिशांचा गोफ ' या कवितेंत आली आहे. ' स्थिर भरला परमानंद ' ही कल्पना ' बाळें तीं खेळत होतीं ' या कवितेंतील आहे.

पण बालकवींचें सारें लक्ष सौंदर्य या एकाच तत्त्वांत केंद्रित झालें आहे. मानवी आयुष्याचें ध्येय कोणतें असावें ? या प्रश्नाला ' अष्टदिशांचा गोफ' या कवितेत बालकवींनीं पुढील असंदिग्ध उत्तर दिलें आहे—

सुंदरतेच्या सुमनावरचें दंव चुंबुनि घ्यावें
चैतन्याच्या गोड कोंवळ्या उन्हांत हिंडावें
प्रीतिसारिका गीत तियेचें ऐकावें कानीं
बनवावें मन धुंद रंगुनी काव्य सुधापानीं

## विश्वात्मक सौंदर्याचा ध्यास

ज्या सौंदर्याचा ध्यास बालकवींना लागलेला आहे तें मानवी जगांतील

ललनेचें उन्मादक सौंदर्य नसून निसर्गातील विविध दृश्यांत अथवा वस्तूंत सामावलेलें सौंदर्य होय हें कधींहि विसरूं नये. निसर्गातील एखाद्या विशिष्ट वस्तूंतील सौंदर्य असा अर्थ बालकवींना अभिप्रेत नसून प्रत्येक वस्तूतील सौंदर्य असाच त्यांचा आशय आहे. हें सौंदर्य त्यांना मेघांत, निर्झरांत, फुलांत, तारकेंत–सर्वत्र दिसते. थोडक्यांत सर्वच निसर्ग सौंदर्यानें ओत-प्रोत भरलेला असून मेघ, निर्झर, फुले, तारका हीं केवळ त्यांचीं विविध रूपें होत असाच बालकवींचा आशय आहे.

संध्यासमयीं आकाशामध्यें जास्वंदीच्या रंगाची छटा पसरली असतांना सौंदर्याची लयलूट दिसते; प्रभातकालीं पूर्व दिग्भागीं ' साजिरा रंग ' दिसूं लागल्यावर वनांमध्यें मूर्तिमंत सौंदर्यदेवताच अवतरल्या आहेत असा भास होतो; आकाशांत रात्रीं तारकांचा उदय झाला असतां

सौंदर्यें शब्दातीत — स्वर्भूवर अवतरत
तेजाची फुटली पेठ — दिव्यत्वाची लयलूट.

आकाशांत जी हीं सौंदर्यें आहेत त्यांचा केंद्र म्हणजे शुक्र. हें सौंदर्य इतकें मोहक आहे कीं कवीचे मन अक्षरशः वेडें झालें आहे. या सौंदर्या-मध्यें त्याला विश्वाच्या सत्यस्वरूपाचा साक्षात्कार झाला आहे.

सौंदर्यें वेडें झालें–तेजाची वारुणि प्यालें.
दिव्याच्या मागुनि चाले–विश्व खरे, कळुनी आलें
केंद्र तया सौंदर्याचा–शुक्र नभीं उगवे साचा.

चांदणे पडले म्हणजे आकाशांत अशीच तेजाची लयलूट होते आणि ' सौंदर्याची वेल ' बहरते. हेंच दिव्य सौंदर्य कवीला अवखळपणें वाह-णाऱ्या निर्झरांत दिसतें. निर्झर म्हणजे सौंदर्याचें निधानच. हे सौंदर्य विश्वा-मध्यें मुक्त हस्ताने निर्झरानें उधळून द्यावें, मानवाची वृत्ति सौंदर्यानें विकसित व्हावी आणि प्रेम, शांति व सौंदर्य यांच्या योगें अखिल विश्व वेडावून जावें अशी कवीची उत्कट इच्छा आहे. कवीला सृष्टींतील

अगणित वस्तूंच्या ठायीं सौंदर्याची लयलूट दिसत असून ज्या अभागी माणसाला याचा दिव्य साक्षात्कार होत नाही त्याची कवीला करुणा येते. जर हें सौंदर्य आपोआप दिसत नसेल तर अशा माणसाने सौंदर्याचा अभ्यासच केला पाहिजे असा कवीचा आग्रह आहे. सृष्टींत सौंदर्याचा साक्षात्कार कोठें होईल हें कवीनें 'सौंदर्याचा अभ्यास कर' या कवितेत सांगितलें आहे.

सूर्याचीं किरणें, सुनिर्मल तशा त्या तारकामालिका,
संध्येचे रमणीय रंग, उदयीं सृष्टी मनोहारिका,
वृक्ष श्यामल पुष्पसंकुल चलद्दूर्वादलच्छादिता,
वाहे शांतपथा सुरम्य सरिता कल्लोलमालायुता.

## विश्वसौंदर्याच्या साक्षात्काराची प्रक्रिया

सूर्य, तारे, संध्याकालीन रक्तिमा, उषा, श्यामल वृक्ष, हिरवळ, फुलें, नद्या इत्यादि सौंदर्यनिधानें जगतांत. डोळ्यांसमोर असतानासुद्धा ' सौंदर्य कोठें आहे ? ' असा प्रश्न विचारणारा माणूस वेडाच असला पाहिजे. हें सारें विश्व सौंदर्यानें ओतप्रोत भरलेलें आहे. या सौंदर्यपूर्ण विश्वांत प्रेमानें अभिषिक्त झालेले रमणीय चित्र दिसते. या रमणीयतेमुळे चित्तालाहि रमणीयता प्राप्त होते आणि मग या चित्ताच्या रमणीयतेचे संगीतांत रूपांतर होतें.

प्रेमानें अभिषिक्त चित्र मग त्या रामण्यविश्वीं दिसे
चित्ताची रमणीयता उतरुनी संगीत होतें तसे.

उत्कट आनंदानें ओसंडून वाहणारें काव्य कसे निर्माण होतें त्याचा हा इतिहास आहे. ही काव्यनिर्मितीची प्रक्रिया आहे. निसर्गाचे अवलोकन करण्याच्या प्राथमिक अवस्थेपासून प्रत्यक्ष काव्य निर्माण होईपर्यंत कोणते भिन्न मानसिक व्यापार होत असतात याचें या ठिकाणी बालकवींनीं उत्कृष्ट वर्णन केलें आहे.

निसर्गातील दिव्य सौंदर्याच्या अवलोकनानें मनावर मोहनी पडते. ही

एक प्रकारची तंद्रीच होय. सौंदर्यामुळें जणूं कांहीं ‘ प्रेमाचा लोंढाच ’ पृथ्वीवर अवतीर्ण होतो. सौंदर्याची ही वृष्टि होत असतां कवीला अन्य कोणत्याही गोष्टीची यत्किंचित जाणीव राहत नाही. सौंदर्य ही एकच गोष्ट जगांत आहे असे त्याचे मन त्याला सांगते. चक्षुरिंद्रियाने या सौंदर्याचें अवलोकन केल्यावर ते त्याच्या हृदयांत संक्रांत होते. असें झाल्याबरोबर हृदयामध्ये भावनांचा उद्रेक होतो. भावनांचा उद्रेक झाल्यावर त्या हृदयांत सामावू शकत नाहीत; त्याचे विविध कल्पनांत रूपांतर होते; या कल्पना एकमेकात गुरफटतात, त्यांचे रुचिर मीलन होतें; आणि शेवटीं त्यांची मधुर संगीतांत परिणति होते. हेच कवीचे मूर्त काव्य होय. या मूर्त आविष्कारात कवीच्या सर्व उत्कट भावनांना आकार प्राप्त होतो. हें सर्व कवि जाणिवेनें करतो असे मुळींच नाही. हे सर्व व्यापार अबोधपूर्व होत असतात. उत्कट भावनांचे मूर्त काव्यांत रूपांतर होत असतां कवीला तंद्रीच लागलेली असते. या तंद्रीतच त्याला बाह्य उपाधींचा पूर्ण विसर पडतो. काव्यनिर्मितीची ही प्रक्रिया बालकवींनीं ‘ काव्याची कल्पना ’ या कवितेत उत्कृष्टपणें वर्णिली आहे.

वस्तुवस्तुमधिं काव्य विलसते
श्रवणी नयनीं हृदयी उतरुनि
पूर्ण करी जे जड जीवातें
बाह्य वेष जरि सुंदर धरितें
मंजुगीत त्यामधुनि स्फुरते
दिव्य अहा मग तें अवतरतें.

तात्पर्य, बालकवींना ज्या सौंदर्याचा साक्षात्कार झालेला आहे तें सौंदर्य त्यांना ‘ वस्तुवस्तुमधिं ’ दिसलें आहे. हे विश्वात्मक सौंदर्य आहे असेंहि म्हणतां येईल. विश्वात्मक सौंदर्याची ही कल्पना म्हणजे निसर्गातील विविध दृश्यांत सामावलेलें अमूर्त सौंदर्यतत्त्व होय. विश्वात्मक सौंदर्याच्या या हव्यासामुळें विशिष्ट सौंदर्याची अभिलाषा बालकवींच्या ठायीं नाहीं;

किंबहुना त्याची त्यांना जाणीवहि नाहीं. अमूर्त सौंदर्याच्या मागें लागल्यामुळें त्यांना सौंदर्यातील विविध छटा व त्यांचे विविध प्रकार यांचा विचार करण्याचे कारणच पडलें नाही.

## सौंदर्यसाक्षात्कारामुळें आनंद व शांति

दुसरें असे कीं बालकवींना जें सौंदर्य दिसलें आहे व ज्याच्या ठायी त्यांच्या साऱ्या चित्तवृत्ति तल्लीन झालेल्या आहेत ते सौंदर्य मानवी जगतांतील नसून सृष्टीच्या विविध स्वरूपांतील अमूर्त सौंदर्य आहे हें एकदा लक्षांत घेतलें म्हणजे या सौंदर्याच्या साक्षात्काराने त्यांच्या मनांत निर्मळ आनंदाची व उदात्त प्रेमाची एकरूप भावना कां निर्माण झाली ते तावडतोब कळून येईल. रमणीच्या आकर्षक व उन्मादक सौंदर्याच्या दर्शनाने चित्तवृत्ति उल्लसित होतात हे खरे असलें तरी त्यामुळें अभिलाषा, आसक्ति इत्यादि विकार प्रादुर्भूत होणें अगदीं अपरिहार्य असतें. असे विकार प्रादुर्भूत झाले म्हणजे वृत्तीची निरागसता नष्ट होते. या प्रकारच्या उन्मादक सौंदर्याविषयीं पाहणाराला जें प्रेम वाटतें तें आसक्तीनें कलुषित झालेलें असते. परंतु सृष्टिसौंदर्याच्या बाबतींत असें होत नाहीं. या सौंदर्याच्या अवलोकनानें दिव्य व निरागस आनंद प्राप्त होतो;कोणतेहि हीन विकार प्रादुर्भूत होत नाहींत. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी कीं, अलौकिक शांति चित्ताला लाभते. मानवी सौंदर्यामुळें अभिलाषा उत्पन्न होऊन विकाराची खळबळ झाली म्हणजे असलेली चित्ताची शांति नष्ट होते व भावनांचा विलक्षण प्रक्षोभ होतो. अर्थात् या अनावर प्रक्षोभांत सुद्धां एक अलौकिक आनंद असतो अशी सार्वत्रिक अनुभूति आहे. पण बालकवींना या प्रकारच्या आनंदाची अभिलाषा नाहीं. त्यांना दिव्य शांततेची, अविकृत मानासिक समाधानाची आसक्ति आहे. ही दिव्य शांतता, हें अविकृत मानासिक समाधान मानवी जगांत त्यांना लाभणे शक्यच नव्हतें. आणि म्हणूनच निसर्गसौंदर्याशीं तादात्म्य पावून त्यांनी निरागस, अकलंकित आनंद आणि दिव्य शांति यांची

प्राप्ति करून घेतली. 'फुलें शांतिची अहा उधळलीं जगतीं चौफेर.' निसर्गातील शांतता कवीच्या मनांत संक्रांत झाली असून व्यावहारिक जगतामध्यें जे मानसिक स्वास्थ्य कवीला मिळाले नाहीं तें निसर्गाच्या सान्निध्यात गवसलें.

निसर्गातील सौंदर्याचा साक्षात्कार झाल्यामुळें बालकवींच्या व्यथित मनाला निरागस आनंद लाभला व ' गंभीर शांति ' प्राप्त झाली ही गोष्ट लक्षांत ठेवणे आवश्यक आहे. कारण तिच्यायोगें बालकवीच्या मनोवृत्तीचें स्वरूप कळून येतें. मानव जातीच्या बाल्यावस्थेंत सृष्टींतील अद्भुत व दिव्य सौंदर्याच्या अवलोकनानें आपले पुराण पूर्वज पराकाष्ठेचे स्तिमित झाले, त्यांचीं मने भांबावून गेलीं, उत्कट आनंदानें तीं ओसंडून वाहूं लागली; आणि त्या दिव्य सौंदर्यापुढें, त्या दिव्य तेजापुढें त्यांनीं भक्तिभावाने लोटांगण घातले. सृष्टीतील दिव्य तेजानें व सौंदर्यानें आपादमस्तक पुलकित होण्याचें व उत्कट आनंदाने मुग्ध होण्याचें जें सामर्थ्य संस्कृतीच्या बाल्यावस्थेतील भोळ्या व हळव्या मानवाच्या टायीं होतें तें सामर्थ्य कालेंकरून क्षीण होत गेलें; आणि आधुनिक काळीं यंत्रयुगाच्या आहारीं गेलेल्या व्यवहारी मानवाला निसर्गसौंदर्याचें अनिमिष नयनांनी निर्भर अवलोकन करण्याइतपत फुरसत मिळत नाहीं आणि फुरसत मिळाली तरी निसर्गाच्या सान्निध्यांत उत्कट आनंदानें पुलकित होऊन स्वतःला विसरून जाण्यासाठीं जी संवेदनक्षमता असावी लागते ती संवेदनक्षमताहि आतां उरलेली नाहीं अशी तक्रार अनेकांनीं केली आहे. आणि या तक्रारींत पुष्कळसें तथ्यहि पण आहे. पण निसर्गाशीं तादात्म्य पावून त्याच्या सौंदर्याने हर्षनिर्भर होण्याचें जे सामर्थ्य आतां क्षीण झालें आहे असें आपण म्हणतो ते सामर्थ्य बालकवींमध्ये अक्षरशः अतिरेकाला पोचलेलें आहे.

## बालत्वसुलभ कुतूहल

लहान मूल ज्या आश्चर्यातिरेकानें व उत्कट आनंदानें व तन्मयतेनें

एखाद्या नवीन गोष्टीकडे पाहत असते त्याच आश्चर्यातिरेकानें, उत्कट आनंदानें व तन्मयतेनें बालकवि निसर्गाच्या विविध स्वरूपांकडे पाहत आहेत. कुतूहल—आत्यंतिक कुतूहल ही बालत्वसुलभ गोष्ट बालकवींच्या ठायीं भरपूर आहे. पाऊस पडूं लागला, गारांचा वर्षाव झाला, आकाशात इंद्रधनुष्य दिसले, ढगांचा गडगडाट झाला, वीज चमकली म्हणजे लहान मुलांचे मन ज्या आनंदानें नाचूं बागडूं लागतें त्याच आनंदाने बालकवींचे मनहि शुक्रोदय पाहून अथवा चादणे पाहून अथवा निर्झराच्या क्रीडा पाहून उचंबळून येतें व अक्षरशः नाचूं लागते. त्यांची तन्मयता अगदीं लहान मुलाच्या तन्मयतेप्रमाणेंच आहे. जोंपर्यंत बाल्य आहे तोंपर्यंतच मुलाला या उत्कट आनंदाचा लाभ होत असतो. वय वाढूं लागलें म्हणजे कुतूहलाचा अतिरेक कमी होतो, संवेदनक्षमता क्षीण होते, आनंदानें नाचण्याबागडण्याचा मोह पूर्वीसारखा होत नाहीं, पूर्वीप्रमाणें वृत्ति स्तिमित होत नाहीं, भान हरपत नाहीं, भावना उचंबळून येत नाहींत, एवढ्याशा कारणानें डोळे ओले होत नाहींत. आणि यामुळें माणसाच्या आनंदाला भरतें येत नाहीं, तो स्वतःला विसरूं शकत नाहीं अशी कवींनीं वारंवार तक्रार केली आहे. हीच तक्रार वर्ड्स्वर्थने केली आहे—

There was a time when meadow, grove and stream
The earth and every common sight,
To me did seem
Apparell'd in celestial light,
The glory and the freshness of a dream.
It is not now as it hath been of yore;—
Turn wheresoe'er I may,
By night, or day
The things which I have seen I now can
see no more

The rainbow comes and goes,
And lovely is the rose;
The moon doth with delight
Look round her when the heavens are bare;
Waters on a starry night
Are beautiful and fair;
The sunshine is a glorious birth;
But yet I know, where'er I go,
That there hath passed away a glory from
the earth.$

बालकवींच्या बाबतींत असे झाले नाहीं. त्यांची वृत्ति शेवटपर्यंत एखाद्या निरागस मुलाप्रमाणेंच अल्लड राहिली. निसर्गांतील सौंदर्याकडे प्रथम पाहिल्यावर सृष्टीच्या बाल्यावस्थेतील संवेदनक्षम मानवाला जो उत्कट आनंद प्राप्त झाला असेल अथवा लहान मुलाच्या निष्पाप डोळ्यांत जो आनंद ओसंडून वाहतो तसलाच आनंद, अगदी उत्कट आनंद बालकवींना निसर्गांतील सौंदर्याकडे पाहतांना शेवटपर्यंत होत असे. त्या आनंदाने ते अक्षरशः वेडावून जात आणि त्या दिव्य सृष्टिसौंदर्यापुढें लोटांगण घालून 'उदो उदो सौंदर्यदेवते' असे भावनावश होऊन उद्गार काढीत.

## दिव्य, अमूर्त निसर्गसौंदर्य व उन्मादक मानवी सौंदर्य

बालकवींची ही सौंदर्यदेवता कोणी शरीरधारी मानवी सौंदर्यदेवता नसून निसर्गांत ठायीं ठायीं भरलेलें दिव्य, अमूर्त सौंदर्य होय हें नीट लक्षांत घेतलें म्हणजे या सौंदर्यदेवतेच्या उपासनेमुळे त्याना परमानंद व रुचिर शांति या दुर्लभ गोष्टींचा लाभ कसा होऊं शकला याचा सहज उलगडा होईल. बालत्वसुलभ कुतूहल आणि आनंदाने बेभान होण्याची

$ *Ode on the Intimations of Immortality.*

वृत्ति या दोन गोष्टींमुळेंच बालकवींना निसर्गाशीं तादात्म्य पावणें जमलें व त्यांच्या सौंदर्यामधून मानसिक शांतता प्राप्त करून घेतां आली.

विश्वांत सामावलेल्या अमूर्त सौंदर्याचाच ध्यास लागल्यामुळें बालकवींना निसर्गातील विविध वस्तूंमध्यें स्त्रीचे शरीरसौंदर्य दिसलें नाहीं. तारका, वायु, रजनी इत्यादि गोष्टींवर त्यांनीं सचेतनत्वाचा आरोप केलेला आहे हें खरें असलें तरी त्यांच्या ठिकाणी असलेलें सौंदर्य पाहून एकाद्या लावण्यवतीच्या अवयवांच्या ठिकाणीं विलसणारें उन्मादक सौंदर्य बालकवींना दिसलें नाहीं. कालिदासाच्या बाबतींत हा प्रकार झालेला आहे. आणि यामुळेंच बालकवींची सौंदर्यविषयक कल्पना व कालिदासाची सौंदर्यविषयक कल्पना यांमधील भेद स्पष्ट दिसून येतो. निसर्गाचें वर्णन करीत असतां कालिदासाला स्त्रीचे उन्मादक अवयव विसरणें अशक्य होतें. स्त्रीचे विलास त्याच्या दृष्टीसमोर सारखे तरळत असतात. थोडक्यांत, निसर्गातील रमणीय दृश्यें पाहिलीं म्हणजे त्याला रमणीच्या सौंदर्याचा पुनःप्रत्यय येतो आणि त्यामुळें त्याचें मन इतकें बेभान होतें कीं निसर्गाचें वर्णन त्याला महत्त्वाचें वाटत नसून स्त्रीच्या सौंदर्याचें वर्णनच महत्त्वाचें वाटत असावें असा भास होतो. पर्वताकडे पाहिलें म्हणजे हा पृथ्वीचा स्तन तर नाहीं ना अशी शंका त्याला येऊं लागते. नदीच्या पृष्ठभागावरील मंद लहरींचें दर्शन झालें म्हणजे त्याला लगेच भ्रूभंगानें रमणीय दिसणाऱ्या ललनामुखाची आठवण होते. खडकाळ प्रदेशांतून अडखळणाऱ्या नदीच्या प्रवाहांतील भोवरे पाहिले म्हणजे त्याला नाभिप्रदेश अनावृत होईल अशा कौशल्यानें चालणाऱ्या मदालसेचें दृश्य दिसूं लागतें. नदीच्या कृश प्रवाहाकडे पाहिलें म्हणजे त्याला विरहावस्थेमध्यें काळजीमुळें कृश झालेल्या विरहिणीची आठवण होते. नदीचें निळसर पाणी त्याला सौंदर्यशालिनीच्या तलम निळ्या रेशमी वस्त्राप्रमाणें दिसतें. वाऱ्याच्या मंद झुळकीबरोबर पाण्याची हालचाल झाली म्हणजे नितंबभागांवरून निसटलेल्या वस्त्राची त्याला आठवण होते. तात्पर्य, निसर्गाच्या रम्य रूपाकडे पाहिले असतां बालकवींना जसा निरागस

आनंद होतो व रुचिर शांति लाभते तसा कांहींच प्रकार कालिदासाच्या बाबतींत होत नाहीं. निसर्गातील दृश्यांमुळें त्याला स्त्रीच्या उन्मादक सौंदर्याची तीव्रतेने आठवण होते.

बालकवींची वृत्ति कालिदासाच्या वृत्तीपेक्षां अगदीं निराळी असल्यामुळें निसर्गसौंदर्याचें तन्मय होऊन वर्णन करीत असता उन्मादक स्त्रीसौंदर्याची अथवा धुंद कामुकतेची वर्णने करण्याचा मोह त्यांना होणें संभवनीयच नव्हतें. आणि निसर्गाच्या सौंदर्याशिवाय इतर कसलेंहि सौंदर्य त्यांच्या मनाला भुरळ घालूं शकत नाहीं. स्त्रीसौंदर्याचें वर्णन करण्याचा त्यांनीं दोन तीन ठिकाणीं प्रयत्न करून पाहिलेला आहे. पण हा प्रयत्न सफल होणें शक्यच नव्हतें. कारण बालकवींची वृत्ति याला प्रतिकूल होती. ‘ जादुगारीण ’ या कवितेंत प्रणयाच्या धुंदीचें ओझरतें वर्णन आलें आहे. ‘ तूं तर चांफेकळी ’ या कवितेंत निरागस अल्लड बालेच्या सौंदर्याचें वर्णन कवीनें केलें आहे. पण त्या वर्णनात परिणामकारक उत्कटता मुळींच नाहीं. ‘ Passion ’ ही काय चीज आहे याची बालकवींना कल्पनाहि नाहीं. ‘ थडग्यांतील रमणी ’ या कवितेंत अद्भुत वातावरण निर्माण करण्यांत कवीला थोडेंफार यश मिळालें आहे; पण ‘ हे देवी विजयस्विनी ’ हें संबोधन सोडून दिलें तर लावण्यलतिकेच्या सौंदर्याचा अद्वितीय प्रभाव कसा असतो याचे वर्णन कवीनें मुळींच केलें नाहीं. आणि त्याला तें करतांहि येणें शक्य नाहीं. डी. जी. रॉझेटीच्या काव्यांत या passion चें खरें आविष्करण दिसतें. सौंदर्याच्या साक्षात्कारांत बालकवींना निरागस आनंद प्राप्त होतो. रॉझेटीचा सौंदर्यशोध पराकाष्ठेच्या उत्कट भावनेनें युक्त असून सौंदर्यदेवतेच्या सान्निध्यांत त्याच्या भावनांचा उपशम होत नाहीं किंवा त्याला शांतीहि लाभत नाहीं. पण बालकवीच्या बाबतींत हें घडून आलें आहे. रॉझेटीच्या मनावर सौंदर्याचा जबरदस्त प्रभाव असून सर्व मानवजातीवर हा प्रभाव किती विलक्षण असतो याचें अत्यंत परिणामकारक वर्णन त्यानें एका गाजलेल्या सॉनेटमध्यें केलें आहे.

Under the arch of Life, where love and death,
Terror and mystery; guard her shrine, I saw
Beauty enthroned; and though her gaze struck awe,
I drew it in as simply as my breath.
Hers are the eyes which, over and beneath
The sky and sea bend on thee, – which can draw,
By sea or sky or woman, tc one law,
The allotted bondman of her palm ond wreath.

This is that Lady Beauty, in whose praise
Thy voice and hand shake still,–long known to thee
By flying hair and fluttering hem–the beat
Follwing her daily of thy heart and feet,
How passionately and irretrievably,
In what fond flight, how many ways and days!

या सॉनेटमधील सौंदर्यदेवतेच्या नेत्रांत मृदु स्मिताची छटा नाहीं, तर दर्पोद्धत विजयभावना आहे. तिच्या नेत्रकटाक्षांतील तेजाची दीप्ति असह्य आहे, आपल्या पायाशीं सर्व जगाला लोटांगण घालावयास भाग पाडणारा दिमाख त्यांत आहे. आणि तरी तिच्या सौंदर्याची व दिमाखाची अशी कांहीं मोहिनी मानवावर पडते कीं त्या मोहिनीमुळें त्याचें हृदय तिच्यामागें वेड्यासारखें धावतें आणि त्याचे पायहि हृदयाचेंच अनुकरण करतात. माणसाच्या इच्छाशक्तीचा हा पराभव आहे. उन्मत्त सौंदर्याच्या हुकमतींत सुख मानणें ही त्याची शरणागतीचीच कबुली आहे. मानवाला दास करणारें हें सौंदर्य आहे. त्याच्या सान्निध्यांत आपल्या अल्पत्वाची जाणीव झाल्यामुळें मानवाची दृष्टि आपोआप जमिनीकडे वळत आहे. रॉझेटीनें सौंदर्यदेवतेच्या प्रभावाचें हें जें वर्णन केलें आहे त्याच्याबरोबर बालकवींनीं सौंदर्याचें जें वर्णन केलें आहे तें ताडून पाहिलें म्हणजे या दोघांच्या मनोवृत्तींत अगदीं महत्त्वाचा व मूलभूत भेद आहे हें स्पष्ट दिसतें.

## बालकवींच्या प्रेमविषयक कल्पनेचें स्वरूप

सौंदर्याच्या बाबतींत बालकवींची जी वृत्ति आहे तीच प्रेमाच्याहि बाबतींत आहे. सृष्टींतील सर्व वस्तूंच्या ठायीं सामावलेलें सौंदर्य—विश्वात्मक सौंदर्य—बालकवींना अभिप्रेत आहे. किंबहुना बालकवि ज्या सौंदर्याशीं तादात्म्य पावले आहेत तें सौंदर्य अमूर्त ( abstract ) आहे हें विसरतां यावयाचें नाहीं. ज्या प्रेमाचें बालकवींनीं ठायीं ठायीं स्तवन केलें आहे तें प्रेमहि या सौंदर्याच्याच जातीचे आहे. सौंदर्य जसें विश्वात्मक तसेंच प्रेमहि विश्वात्मक. किंवा निराळ्या भाषेंत सांगावयाचें झालें तर विश्वात्मक सौंदर्याविषयीं वाटणारें प्रेम बालकवींना अभिप्रेत आहे. विश्वात्मक सौंदर्य जसें अमूर्त तसेंच हें प्रेमहि अमूर्त आणि अतींद्रिय. स्त्रीला पुरुषाविषयीं जे अलौकिक आकर्षण वाटतें किंवा पुरुषाला स्त्रीविषयीं जें तसलेंच आकर्षण वाटतें आणि ज्या अनावर आकर्षणाला आपण 'प्रेम' ही संज्ञा देतों तसलें प्रेम बालकवींना अभिप्रेत नाहीं, हें प्रथम स्पष्ट करावयास पाहिजे. स्त्रीपुरुषांना परस्पराविषयी वाटणाऱ्या प्रेमाचेंच वर्णन ज्यांमध्यें आलें आहे अशा कविता बालकवीनी जवळजवळ लिहिल्या नाहींतच म्हटलें तरी चालेल. दोन–तीनच कविता अशा आहेत की, त्याच्यामध्यें बालकवि स्त्रीपुरुषांमधील प्रणयभावनेचें वर्णन करीत असावेत असा भास होतो. 'प्रेमाचा पहिला भास' या कवितेमध्यें कवि म्हणतो—'मन्मानस राजसहंसी अवतरली स्त्रीरूपानें'. कवि या प्रेमदेवतेचा दास झाला असून तिच्या पुण्यदर्शनानें त्याच्या जिवाचें निमिषांत सोनें केलें आहे. पण कवि आतां देहाचा दास राहिलेला नाहीं; त्याचा जीव प्रेममय झाला आहे. आणि या प्रेमांतच विश्वाचा अंतर्भाव झालेला आहे. हा प्रेमाचा पहिला भास कवीच्या मनास भारून टाकण्यास पूर्ण समर्थ आहे. या कवितेंत वर्णिलेलें प्रेम मूर्त स्वरूपाचें आहे कीं तें अमूर्त सौंदर्याप्रमाणेंच अमूर्त आहे तें नेमकें सांगता येत नाही. हा प्रेमाचा केवळ भासच असून खरी खरी

उत्कटता त्याला अजून लाभलेली नसावी असे दिसतें. ‘ जादुगारीण ’ या कवितेंत प्रणयाच्या धुंदीचें वर्णन आलें आहे. परंतु ही स्वप्नसृष्टि आहे. ही ‘ जादूची झोप ’ असून तिच्यांत कवीचा जीव गुंगलेला आहे व त्या गुंगींत त्याला ‘ अद्‌भुत सृष्टि ’ दिसत आहे. या स्वप्नसृष्टींत कवि त्या जादुगारणीला ‘धर मज कवळोनी, करपाशीं, स्निग्ध तुझ्या हृदयाशी’ असें विनवीत आहे. तिच्या निकट सहवासानें प्राप्त झालेल्या अननुभूत आनंदानें कवीची काया झिंगून गेली आहे. आपल्याला धुंदी यावी आणि त्या धुंदींत जीव विरून जावा अशी कवीची उत्कट इच्छा आहे.

झांपड जादूची, मन्नयनीं, जादुगारिणी आणी !
झांकळुनी प्राण, धुंदिगण भरुनि जीव बेभान—

## निराश प्रेमाची व्यथा

प्रेमनैराश्याच्या व्यथा व्यक्त करणाऱ्या बालकवींच्या चारपांचच कविता आहेत. ‘ —ला ’ या कवितेतील स्त्री मर्त्यसृष्टीतील आहे कीं स्वप्नसृष्टींतील आहे तें कळावयास मार्ग नाहीं. शिवाय या लहानशा कवितेंतील विषण्णतेची भावना प्रेमभंगामुळेंच उद्‌भवली आहे कीं काय याविषयींहि संदेह आहे. दुःखानें व्यथित झालेल्या मनःस्थितींत अवाचित तिची मूर्ति दिसल्यावर कवीनें ‘ हाय ! ’ असा उद्‌गार काढलेला आहे, तो आनंदाचा द्योतक आहे कीं दुःखातिरेकाचा द्योतक आहे ते कळत नाहीं. यामुळें या कवितेतील भावना प्रणयभंगाचीच आहे की काय अशी शंका घेण्यास जागा आहे. ‘ भटकणें ’ या कवितेत कवि म्हणतो—

मैदानावरि खुळ्या पिशापरि भटकत फिरलों किती !
किती लोटली रात्र तयाची नाहीं हृदया क्षिती !
किति हृदयाची तीव्र वेदना तुजसाठीं सोशितो !
परि अजुनी तूं दूर किती वट पथ दुःखद वाटतो.

प्रेमदेवतेच्या मागें कवि वेड्याप्रमाणें भटकत आहे; पण ती अजून दूर आहे असा विलाप तो करीत आहे. यावरून तिनें त्याच्या प्रणययाचनेचा अव्हेर केला असून ती त्याच्या आटोक्यांतील नाहीं आणि म्हणून तो कष्टी झाला आहे असें दिसतें. याला याच कवितेंत पुरावा आहे.

तुझ्याजवळ मी कशी देवते, प्रेमयाचना करूं ?
मी गवताहुनि दीन दास तव, दूर नको परि धरूं
थोर थोर नर नित्य वांच्छिती तुझें कृपावीक्षण,
तव चरणाच्या धूळिं लोभलें दुबळें माझें मन !

या ओळींवरून प्रेमदेवतेजवळ आपलें प्रेम प्रकट करावयाचा अजून कवीला धीरच झालेला नाहीं, असें स्पष्ट दिसतें. याचें कारण त्यानेंच सांगितलें आहे. ती उच्चपदीं विराजत आहे आणि हा स्वतःला क्षुद्र मानीत आहे. तेव्हां ही प्रेमभंगाची व्यथा नसून प्रणयभावना प्रकट करण्याचा धीरच होत नाहीं म्हणून होणारी वेदना आहे. ' मूढ मालती ' या कवितेंत प्रेम स्थिर राहूं शकेल कीं तें क्षणभंगुर ठरेल अशी शंका हृदयाला जाळीत असते ही कल्पना आविष्कृत झाली आहे.यामुळें हीहि कल्पना साक्षात् प्रेमभंगाच्या व्यथेवर आधारलेली नाही हे उघड आहे. प्रीतीचा घात ही अत्यंत भयंकर गोष्ट असून तो दुसरा कल्पांतच होय अशी कल्पना ' प्रीति हवी तर ' या कवितेंत व्यक्त झाली आहे. प्रीति ही 'तलवारीची धार' किंवा ' नागिणी लसलसती ' असून प्रीतीसाठीं जीव ' कुरबान ' करावा लागतो. प्रीति हा जहरी प्याला आहे—

परि प्रीतीचा घात भयंकर दुसरा कल्पांत
जीवंतपणीं मरण घेउनी फिरणें जगतांत.

या कवितेंत प्रेमभंगाच्या दुःखाची दारुणता वर्णिली असली तरी कवीच्या वैयक्तिक अनुभवांतून ही कल्पना स्फुरलेली असावी असें वाटत नाहीं केवळ प्रेमाच्या बाबतींत एक सार्वत्रिक सत्यच कवीला सांगावयाचें असावें असें वाटतें. हें आत्मनिवेदन दिसत नाहीं.

आणखी एक कविता आहे. आणि ती या सर्व प्रेमगीतांत महत्त्वाची आहे. ‘ कवीची इच्छा ’ ही ती कविता होय. या कवितेंतील भावना मागच्या कवितेंतील भावनेपेक्षां अधिक उत्कट आहे. कवीला खरे प्रेम मिळालें नाहीं, प्रेमाचा फक्त भास झाला, प्रेमाचा खेळ झाला. यामुळें पराकाष्ठेची उद्विग्नता आली. कवि जगाला विटला. आणि जगाचीं सारीं बंधनें झुगारून द्यावीं असा विचार त्याच्या मनांत प्रबल झाला. त्याची विषण्णता इतकी अतिरेकाला गेली आहे कीं कीर्ति, प्रत्यक्ष प्रेम, सौख्य, विलास, किंबहुना मृत्यु यांपैकीं कोणीहि त्याला आतां अडवूं शकणार नाहीं. चिंता, अश्रु, ममता, निःश्वास या गोष्टी अगदीं व्यर्थ होत असें त्याच्या मनानें पुरतेपणीं घतलें आहे. कवि शेवटीं आवेगानें म्हणतो—

पुरे संबंध प्रेमाचा—नको हा खेळ प्रेमाचा
खरा जो प्रीतिचा प्याला—जगीं प्याला सुखी झाला.

या ओळींतील भावना अगदीं स्पष्ट आहे. खरें प्रेम कवीला लाभलेलें नसून अनेक भास दाखवून तें कांचनमृगाप्रमाणें अदृश्य झालें आहे. प्रेमाचा हा केवळ खेळ झाला आहे. म्हणून ज्याला खरें प्रेम लाभलें तोच खरा सुखी होय असें म्हणणें कवीला भाग पडलें आहे. प्रीतीला लाल गुलाबांचा रंग लावलेला नसून तिला रुधिराचा रंग लावलेला आहे; प्रीति हा जहरी प्याला आहे या कल्पना ‘ प्रीति हवी तर—’ या कवितेंत कवीनें व्यक्त केल्या आहेत. प्रीतीचा प्याला जहरी आहे असें अनुभवाला आल्यावर आणि प्रेमाचा खेळ केवळ छळालाच कारण झाला हें दिसल्यावर ‘ पुरे संबंध प्रेमाचा ’ असे वैतागाचे उद्गार कवि काढीत आहे.

या शेवटच्या प्रेमगीतांतील भावना अत्यंत उत्कट आहे असें दिसतें. प्रेमाविषयीं केवळ सार्वत्रिक सत्य याहि ठिकाणीं कवीला सांगावयाचें आहे कीं त्याच्या वैयक्तिक भावनांची ही कहाणी आहे तें निश्चितपणें सांगतां येणें कठिण आहे. हीं सर्व प्रेमगीतें बालकवींनीं नेमकीं केव्हां लिहिलीं हें ठरविण्यास कांहीं साधन नाहीं. प्रेमभंगाची घटना खरोखरच त्यांच्या

आयुष्यांत घडलेली होती असें त्यांच्या उपलब्ध चरित्रावरून दिसत नाहीं. मग प्रेमभंगाची ही कल्पना केवळ कल्पनासृष्टींतीलच काय ? पण या कवितेंतील उत्कटता इतकी विलक्षण आहे व भावनाविष्करण इतकें प्रामाणिकपणें झालेलें दिसतें कीं ही केवळ कल्पनासृष्टि नसून आत्मानुभूतीचा त्यात बराचसा अंश असावा असे वाटू लागतें. उत्कट भावना कवि आत्मानुभूतीवांचून सहसा व्यक्त करूं शकत नाहीं. दुसऱ्यांच्या भावनांचें वर्णन कवीनें कितीहि चातुर्यानें व सहानुभूतीनें केले तरी त्यांतील तिऱ्हाइतपणाची भावना मनाला जाणवल्याशिवाय राहत नाहीं. या कवितेत बालकवि प्रणयनैराश्याची भावना केवळ तटस्थपणानें आणि तिऱ्हाईतपणें वर्णीत आहेत असे दिसत नाही. मग ही खरोखरच आत्मानुभूति असावी काय ?

## प्रेमगीतांतील आत्मानुभूति

इतर प्रेमगीतांचा लेखनकाल उपलब्ध नसला तरी 'कवीची इच्छा' हें गीत १९१४ च्या एप्रिलमध्ये प्रसिद्ध झाले असा पुरावा मिळतो. या वेळीं बालकवि पंचवीस वर्षांचे होते. या वयात भावनाची उत्कटता असह्य असते हें खरें. पण प्रत्यक्ष या सुमारास प्रेमभंगाचा चटका लागून कवीला उद्वेग वाटावा अशी वस्तुस्थितींतील घटना आपल्या परिचयाची नसल्यामुळें या बाबतींत निश्चित निर्णय देण्याचा धीर होत नाही. वस्तुस्थिति अशी आहे कीं, ज्या काळांत बालकवींनीं ही कविता लिहिली त्या काळांत स्त्रीपुरुषांचे विवाह अल्प वयातच होत असत. यामुळें विवाहाच्या पूर्वी प्रेम निर्माण होणे व त्या प्रेमाची निराशा होणें ही गोष्ट बहुधा अशक्य असे. बालकवींचा विवाह त्यांच्या वयाच्या एकोणिसाव्या वर्षी झाला. अशा स्थितींत विवाहापूर्वी त्यांचें एखाद्या मुलीवर प्रेम बसलें असेल व त्या प्रेमाला प्रतिशब्द न मिळाल्यामुळे त्यांना उद्विग्नता आली असेल असा तर्क करवत नाहीं. अर्थात् हा विवाहपूर्व प्रणयभंगाचा प्रकार असणें

जवळजवळ असंभाव्य आहे. चाळीस वर्षांपूर्वी या गोष्टी कठिण होत्या. आज त्या अगदीं सुलभ आहेत. मुद्दा असा कीं, प्रणयभावना अत्यंत उत्कट होण्याचें जे वय त्या वयाचे आगमन होण्यापूर्वीच माणसांचे विवाह होऊन गेलेले असत. उरली एकच शक्यता. ती म्हणजे विवाहोत्तर प्रेमाची. बालकवींचें वैवाहिक जीवन सुखाचें नसावें असा तर्क करण्यास भरपूर पुरावा आहे. यामुळें दुसऱ्या एखाद्या मुलीविषयीं विवाहोत्तर जीवनामध्ये त्यांना प्रेमाचें आकर्षण वाटलें असण्याची शक्यता आहे. पण ही शक्यतासुद्धां अगदीं दुबळी आहे. कारण, ज्या काळांत (१९१०) "स्त्रियांनीं पायांत जोडा घालणे, हातांत छत्री घेणें हीं छचोरीचीं लक्षणें समजली जात" त्या काळांत प्रेमाची उत्कट भावना निर्माण होण्यासाठीं अत्यंत आवश्यक असलेला स्त्रीपुरुषांचा निकट सहवास ही गोष्ट खरोखरच दुरापास्त होती. अगदीं पुढारलेल्या सुधारकाच्या घरांत कदाचित् स्त्रीपुरुषांच्या अनिर्बंध सहवासाची शक्यता असेलहि, पण बालकवि ज्या वातावरणांत वावरत होते त्या वातावरणात ही गोष्ट खास कठिण होती. यामुळें विवाहोत्तर जीवनांत एखाद्या मुलीवर निःसीम प्रेम बसून तिच्याकडून त्या प्रेमाची परतफेड न झाल्यामुळे बालकवि पराकाष्ठेचे वैतागले असतील काय या प्रश्नाचे उत्तर मिळत नाहीं. स्त्रीपुरुषांचा अनिर्बंध सहवास वरच्या वर्गातील लोकांच्या वातावरणांत आज मोठ्या प्रमाणावर घडत असल्यामुळे विवाहपूर्व प्रेमाची उत्कट भावना निर्माण होणें आज सुलभ झालें आहे. इतकेंच नव्हे तर समाजव्यवस्थाच इतक्या झपाट्यानें बदलत आहे कीं, विवाहोत्तर जीवनामध्येंहि विवाहित पुरुष व अविवाहित तरुणी यांचा अनिर्बंध सहवास घडण्याची भरपूर शक्यता आज आहे; परिस्थितीच या गोष्टीला कितीतरी अनुकूल आहे. यामुळें विवाहानंतरसुद्धां एखाद्या स्त्रीच्या प्रेमपाशांत सांपडून प्रेमाची उत्कट भावना अनुभवणें, इतकेंच नव्हे तर प्रतिकूल घटनांमुळे उत्पन्न होणारी प्रेम-नैराश्याची उत्कट भावना अनुभवणेंहि आज शक्य आहे. परंतु ज्या काळांत

बालकवींनीं आपली प्रेमगीतें लिहिलीं अथवा गडकऱ्यांनीं आपलीं प्रेमगीतें लिहिली त्या काळांत ( १९१०–१८ ) विवाहित पुरुषांना अविवाहित तरुणींचा अनिर्बंध सहवास प्राप्त होणें ही गोष्ट सर्वस्वी अशक्य नसली तरी पुष्कळच कठिण असल्यामुळें तत्कालीन कवींच्या प्रेमनैराश्याच्या गीतामध्यें प्रकट झालेली नैराश्याची भावना ही त्यांची खास वैयक्तिक अनुभूति होती कीं ही केवळ कल्पनासृष्टि होती हें निश्चयानें सांगणे फार कठिण होऊन बसलें आहे. शिवाय या बाबतींत पुरावेहि आपल्याकडे फार थोडे असतात. तत्कालीन खाजगी पत्रव्यवहार, कवीच्या रोजनिशा इत्यादि गोष्टी उपलब्ध होणें कठिण असल्यामुळें बऱ्याचशा गोष्टींच्या बाबतींत केवळ तर्कावर विसंबून बसावें लागतें. आणि सर्वांत खेदाची गोष्ट अशी कीं अनेक कवितांचा लेखनकालहि सांपडत नाहीं. कवींच्या भावनांचें विश्लेषण यथायोग्य व्हावयाचें असेल तर कवितांचा लेखनकाल माहीत असणें जरूर असतें. पण दुर्दैवानें इतका साधा पुरावासुद्धां अनेक वेळां उपलब्ध होऊं शकत नाहीं. यामुळें भोंवतालची परिस्थिति, कवीच्या मनाची स्थिति व त्याच्या कवितेंत व्यक्त झालेली भावना याचा अन्योन्यसंबंध पुराव्यानिशीं स्पष्ट करून दाखवितां येत नाहीं.

यामुळें तर्कावर भिस्त ठेवण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं. बालकवींच्या वर उल्लेखिलेल्या दोन प्रेमगीतांतील, विशेषतः 'कवींची इच्छा' या गीतातील, नैराश्याची भावना ही जर खरोखर वैयक्तिक अनुभूतींतून स्फुरलेली असेल तर कोणातरी तरुणीवर त्यांचें उत्कट प्रेम बसलें असेल व प्रेमपूर्ति न होतां तो केवळ 'प्रेमाचा खेळ' ठरल्यामुळें ते विषण्ण झाले असतील ही एक शक्यता आहे. किंवा दुसरी शक्यता अशी कीं ज्या स्त्रीची प्राप्ति होणें कधींच शक्य नव्हतें अशा एखाद्या अधिक योग्यतेच्या स्त्रीविषयीं त्यांना विचित्र आसक्ति वाटूं लागली असेल व आपली इच्छा व्यवहारांत सफल होण्याची त्यांना मुळींच आशा नसेल आणि यामुळें जबरदस्त विषण्णता निर्माण झाली असेल; आणि ज्या प्रणयासक्तीमुळें ही आत्यंतिक

विषण्णता निर्माण झाली त्या आसक्तीलाच उद्देशून 'नको हा खेळ प्रेमाचा' असे वैतागाचे उद्गार त्यांनीं काढले असतील. 'भटकणें' या कवितेंत 'थोर थोर जन नित्य वांच्छिती तुझें कृपावीक्षण' असें वर्णन करून कवि विचारतो 'तुझ्याजवळ मी कशी देवते ! प्रेमयाचना करूं ?' प्रेमयाचना करण्याचा धीर आपल्याला होत नाहीं असे कवि म्हणत आहे; पण या कवितेंतील प्रेमदेवता ही कोणी मानवी प्रेमदेवता मुळीच नसून ती कवित्वशक्ति किंवा प्रतिभाशक्ति होय, आणि तिचाच ध्यास कवीला लागलेला आहे, व तिच्या प्राप्तीसाठीं कवि 'खुळ्या पिशापरि' रानोमाळ हिंडत आहे असेंहि प्रतिपादन करण्याची पूर्ण शक्यता आहे.आणि असे झालें तर मग हाहि आपला आधार नष्ट होईल.

वस्तुस्थिति अशी आहे की प्रणयासक्तीच्या बाबतींत आपल्या मनांतील सर्व भावना जशाच्या तशा व्यक्त करणे त्या काळीं बरेंच कठिण होतें. यामुळें आपल्या मनांतील खऱ्या भावना यथातथ्यपणें व सरळ रीतीनें प्रकट न करिता अनेक वेळां आडवळणाने, व्यंजनेची मदत घेऊन कवि त्या प्रकट करीत असत. आज ही परिस्थिति पार बदलली आहे हें गेल्या कांहीं वर्षांतील महाराष्ट्रांतील तरुण कवयित्रींच्या प्रेमगीतांमध्यें अगदीं स्पष्टपणें प्रकट झालेल्या भावना विचारांत घेतल्या असतां सहज दिसून येईल. पण प्रेमासारख्या नाजुक विषयांतील आपल्या खऱ्या भावना उघड व्यक्त करून सांगणें बालकवींच्या काळीं कवीला फार जड जात असे. यामुळे रूपक,प्रतीक, अन्योक्ति इत्यादि साधनांचा अवलंब करणें त्याला भाग पडत असे. आपली भावना तर व्यक्त व्हावी आणि कोणालाहि त्या भावनाविष्कारावर आक्षेप तर घेतां येऊं नये असाहि हेतु कवीच्या मनांत वावरत असेल,कोणी सांगावें ? एक गोष्ट खरी कीं कवि आपल्या प्रणयविषयक सर्व भावना जशाच्या तशा प्रकट करीत नसे. त्याच्या बऱ्याचशा भावना अंतर्मनांत तशाच दडपून राहिलेल्या असत. समाजस्थिति कदाचित् याला जबाबदार असेल किंवा कवीचें भित्रे मनहि कदाचित् जबाबदार असेल. कवि

आपल्या सर्वच भावनांचे आविष्करण करीत नसून त्याच्या बऱ्याचशा भावना ‘ हृदयाच्या अंतर्हृदयात ’ दडलेल्या असतात व त्या हृदयाचा अंत कधींच लागावयाचा नाहीं हा विचार स्वतः बालकवीनींच ‘ कवीचें अंतरंग ’ या कवितेत सागराचे रूपक आधारासाठीं घेऊन स्पष्ट केला आहे.

सख्या वाचका, गीत कवीचे ऐकुनिया निज कानीं
न वदे, कळलें महाकवीचे अंतःकरण निदानीं.
हृन्मंजूषीं भाव गुप्त जे भरले, जनसंमर्दी
कथील कां कधिं उच्चरवाने कवि हृदयाचा दर्दी !
जा, जाउनिया अब्धिकिनारीं एक शुक्तिका घेई
रंग मनोहर दीप्तिहि अनुपम याविण अन्य न कांहीं.
अगाधगहनें सागर ठेवी झांकुनिया निजहृदयीं
खोल खोल त्याविषयीं कांहीं शब्दहि बोलत नाहीं.

या गीताचा आशय स्पष्ट आहे. आपल्या मनांतील सर्वच भावना व्यक्त करणें कवीला जमत नसून व्यक्त झालेल्या भावनांव्यतिरिक्त अनेक अव्यक्त गूढ भावना त्याच्या हृदयांत अगदीं खोल दडलेल्या असतात.

प्रत्यक्ष एखाद्या स्त्रीविषयीं आत्यंतिक प्रणयासक्ति वाटून बालकवींची त्या बाबतींत दारुण निराशा झाली असेल हें सिद्ध करतां आलें नाहीं तरी एका गोष्टीबाबत कसलाच संदेह नाहीं. ती गोष्ट ही कीं बालकवींचें वैवाहिक जीवन त्यांना पाहिजे होतें तसें नव्हतें. याचा अर्थ असा कीं, आपली पत्नी कशी असावी याविषयीं त्यांच्या कवि-मनाची जी आकांक्षा असेल त्या आकांक्षेचें साफल्य व्यवहारांत झालें नाहीं. या विफल आकांक्षे-मुळें त्यांना नैराश्य आलें असेल, पत्नीमध्यें त्यांचें चित्त खरेंखुरें रमलें नसेल. आणि मग प्रेमाविषयीं ज्या काव्यमय कल्पना त्यांनीं कैक दिवस हृदयांत बाळगल्या असतील त्या कल्पना सत्यसृष्टीमध्यें आपल्या अशिक्षित व अरसिक ( अर्थात् बालकवींच्या कल्पनेप्रमाणें ! त्यांची पत्नी रसिक नसली तरी प्रेमळ व गोड स्वभावाची होती अशी खुद्द ताराबाई टिळ-

कांची साक्ष आहे. ) पत्नीच्या सहवासांत सफल करून घेता आल्या नसतील. तिच्या मनाशी ते समरस होऊं शकले नसतील, किंवा ती त्यांच्या मनाशीं समरस होऊं शकली नसेल. आणि मग एक प्रकारची तीव्र नैराश्याची भावना प्रभावी झाल्यावर अमर्याद इच्छा करणारें बालकवींचें मन स्वप्नसृष्टींत आपल्या असफल प्रेमाची पूर्ति करून घेण्याची धडपड करूं लागलें असेल. वैवाहिक जीवनामध्ये अनेक वेळा अशा प्रकारची घटना घडत असते. मनुष्य कलावंत असला म्हणजे आपल्या विफल आकांक्षा तो कलेच्या क्षेत्रांत पूर्ण करून घेतो. आपल्या दडपून टाकलेल्या भावनांना कलेच्या स्वप्नसृष्टींत तो स्वैर संचार करूं देतो व अशा प्रकारें व्यवहारांत प्राप्त न होणारें मानसिक समाधान तो कलेच्या मदिर वातावरणांत प्राप्त करून घेतो. अशा वेळीं कवि प्रणयाचीं काल्पनिक चित्रें रेखाटून त्यांच्या द्वारें आपल्या अपूर्ण इच्छा प्राप्त करून घेतो किंवा मनाच्या समाधानासाठीं दुसरा एखादा मार्ग कलेच्याच क्षेत्रांत शोधून काढतो. निसर्गाच्या सौंदर्याचें वर्णन करणें हा तो मार्ग होय. आणि हाच मार्ग बालकवींनीं पतकरला.

## सौंदर्य आणि प्रेम अभिन्न

निसर्गातील दृश्यांचें वर्णन करीत असतां कालिदास कसलाहि संकोच न करतां स्त्रीसौंदर्याचीं उन्मादक व गहिरीं दृश्यें वाचकाच्या डोळ्यांसमोर उभीं करतो याचा उल्लेख मागें केलेलाच आहे ( पृ. २९ ). बालकवि या बाबतींत खूपच संकोची वृत्तीचे असल्यामुळें निसर्गसौंदर्याच्या अवलोकनानें उदात्त प्रेम व रुचिर शांति याच गोष्टींची प्राप्ति होत असते हें ते पुन्हां पुन्हां सांगत आहेत. त्यांच्या निसर्गगीतांमध्यें ' प्रेम ', ' प्रीति ' हे शब्द असंख्य वेळां आलेले आहेत. पण या सर्व ठिकाणीं स्त्रीपुरुषांमधील शारीरिक आकर्षण अशी कल्पना त्यांच्या मनांत मुळींच नसून स्वर्गीय प्रेम, दिव्य प्रेम, उदात्त, निरागस व कोणत्याहि प्रकारच्या हीन वैषयिक अभि-

लायेनें जें कलंकित झालेलें नाहीं असें अतींद्रिय प्रेम हीच कल्पना त्यांच्या चित्तांत सदैव आहे. जसें निसर्गातील सौंदर्य दिव्य व विश्वात्मक, तसेंच हें प्रेमहि दिव्य व विश्वात्मक. निसर्गातील सौंदर्य हे इंद्रियग्राह्य असले तर त्या सौंदर्याच्या साक्षात्काराने निर्माण होणारे प्रेम केवळ बुद्धिग्राह्य व अतींद्रिय आहे, ही आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे. जे बुद्धिग्राह्य व अतींद्रिय असतें तें आत्यंतिक सुख होय ही भगवद्गीतेंतील कल्पना जमेस धरली म्हणजे या अतींद्रिय प्रेमाच्या योगें बालकवींना इतका उत्कट व दिव्य आनंद कां होत आहे याचा उलगडा होईल. कांहीं ठिकाणी बालकवि निसर्गातील वस्तूंवर मानवी भावनांचा आरोप करीत असतात हें खरें आहे. ‘ अरुण ’ या कवितेंत दिवस हा प्रियकर आणि रजनी ही प्रेयसी अशी कल्पना करून बालकवि त्यांच्या मीलनाचें पुढीलप्रमाणें वर्णन करतात—

दिवसयामिनी परस्परांचें चुंबन घेतात,
अनुरागाच्या छटा तयांच्या खुलल्या गगनांत.

संध्याकालीन वारा फुलराणीचे चुंबन घेतो अशीहि एक कल्पना ‘ फुलराणी ’ या कवितेंत आली आहे. पण या चुंबनाच्या वर्णनांत कामुकतेचा लेशहि वाचकाला दिसूं नये अशी बालकवींनीं खबरदारी घेतली आहे. हें सारे निष्पापतेचें द्योतक वाटतें. त्यांत कसलाहि उन्माद सांठवलेला नाहीं. तो उन्माद कालिदासाच्या मेघदूतांत पहावयास सांपडेल.

बालकवींच्या कोशांत सौंदर्य व प्रेम या गोष्टी अभिन्न आहेत. निसर्गामध्यें सौंदर्याचा अतिरेक झाला म्हणजे त्याच्या साक्षात्कारांत त्यांना प्रेमाचाहि साक्षात्कार होत असतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. निराळ्या शब्दांत सांगावयाचें झालें तर बालकवींचें प्रेम हे दिव्य सौंदर्याचें प्रेम आहे आणि हें दिव्यसौंदर्य केवळ निसर्गातच त्यांना दिसलें. यामुळें त्यांना निसर्गातील दृश्यांत प्रेम बहरलेलें दिसत आहे. अरुणोदयाच्या वेळची नभःश्रीच्या गालावरील लाली पाहिली म्हणजे ही प्रीतीची ध्वजा फडकत आहे असें त्यांना वाटूं लागतें. या काळाला कोणीं वेडेपणानें ‘ अरुणोदय ’

हें नांव देत असले तरी वास्तविक हा ‘ प्रेमकाल ’ होय; सूर्याचा हात प्राचीच्या गालाला लागल्याबरोबर ती लाजून अधोवदन झाली आणि ‘ प्रेमाची अद्‌भुत लहरी ’ पृथ्वीवर आली. हें जें अद्‌भुत सौंदर्य अरुणोदयाच्या वेळीं आकाशांत अवतीर्ण होतें, ते सौंदर्य म्हणजे मूर्तिमंत प्रेमाची लाट असून या ‘ प्रेमाच्या लाटेखालीं मस्तक नमवावें ’ अशी लालसा कवीला झाली आहे. ज्या प्रेमापुढें मस्तक नम्र करावें असें वाटतें तें प्रेम अत्यंत दिव्य व उदात्त असलें पाहिजे हें सांगावयाची जरूर नाहीं. सूर्याच्या आगमनानें वसुंधरा प्रेमातिशयानें स्वतःला विसरून जाईल असें कवीला वाटतें. वसुंधरेच्या शरीरावर लज्जेचे जे रोमांच आले आहेत त्यामुळें कवीचें मनहि प्रेमातिशयानें बेभान होऊन तो वसुधेला म्हणतो—

प्रेमचंचले ! प्रेमच तुजवर मग तें उधळील !
प्रेमावाचुनि फेड कशानें प्रेमाची व्हावी !

‘ही प्रेमाची लाट’, ‘ हा प्रेमाचा लोंढा ’ आकाशांतून पृथ्वीवर उतरला आहे असें कवि जेव्हां म्हणतो तेव्हां स्वर्गीय सौंदर्याची वृष्टि पृथ्वीवर होत आहे असेंच त्याला म्हणावयाचें आहे. प्रभातकाली अरुणोदय झाला म्हणजे पूर्वदिशा ज्याप्रमाणें प्रेमानें भारली जाते त्याचप्रमाणें सूर्यास्ताच्या समयीं पश्चिमदिशाहि अशीच प्रेमानें भारली जाते. ‘ पहा चमकते प्रेमपताका पश्चिमदिग्वदनीं. ’ तिची प्रेमसमाधि उतरतच नाहीं. इतकी ती बेभान झाली आहे. आकाशांत तारकाबालिका जणूं क्रीडा करण्यासाठीं जमल्या आहेत अशी कल्पना करून कवि म्हणतो—

गगनमंडळीं फेर धरूं दे प्रेमाचा त्यांना
दिशादिशांला तुझीं गाउनी प्रेमाचीं गाणीं
रजनीदेवी ! विश्व टाक हें प्रेमें भारोनी !

हें अद्‌भुत दिव्य प्रेम आणि ब्रह्मानंद यांचें स्वरूप एकच आहे. ‘ ब्रह्मांडाचें हृदय नाचवी प्रेमाच्या रंगे. ’ असल्या या दिव्य प्रेमाचें स्तवन करतां करतां कवीचेंहि चित्त ‘ प्रेमाच्या निद्रेंत रंगलें ’ आहे. हें प्रेम

संपूर्णतया सात्त्विक आहे. मानवाला उदात्त करावयाचें व त्याच्या शुद्ध मनाला शांतता मिळवून देण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें आहे. या प्रेमामुळें आणि या सौंदर्यामुळें भावना क्षुब्ध व विकारदूषित न होतां त्या अधिक पवित्र व उदात्त होत आहेत अशी कवीची अनुभूति आहे.

निर्मत्सर व्हा, प्रेमसंगमीं पोहा चिरकाल
ब्रह्मांडाचा गोल धरी या प्रेमाचा फेर,
फुलें शांतिचीं अहा उधळलीं जगती चौफेर !

या सौंदर्यांत आणि प्रेमांत तल्लीन होऊन जाण्याची कवीची इच्छा आहे. इतकेंच नव्हे तर त्याच्यापुढें मस्तक नमवून अनन्यभावानें तो त्यास शरण गेला आहे. मागें रॉझेटीचें जें प्रसिद्ध सॉनेट उद्‌धृत केलें आहे त्यांतहि सौंदर्यापुढें मस्तक नमविण्याची कल्पना आहे. पण रॉझेटीच्या व बालकवींच्या कल्पनांमध्यें एक अत्यंत महत्त्वाचा भेद आहे. उन्मादक सौंदर्याच्या प्रभावापुढें आपण अगदींच दुबळे आहोंत, त्या सौंदर्याचा दास होण्याशिवाय गत्यंतर नाहीं, आपल्या असमर्थतेची कबुली देऊन त्याला शरण जाण्यावांचून दुसरा उपाय नाहीं, ही रॉझेटीची कल्पना आहे. तो ज्या देवतेच्या प्रेमाची अपेक्षा करीत आहे, त्या देवतेचें सौंदर्य भक्तावर हुकमत गाजविणारें, दाहक आणि उन्मादक आहे. परंतु बालकवि ज्या प्रेमाची उपासना करीत आहेत तें सात्त्विक, मंगल, पवित्र, अतींद्रिय असून त्याच्या कृपाकटाक्षानें सर्वत्र शांतीची अमृतवृष्टि होत आहे. बालकवि ज्या सौंदर्य-देवतेवर प्रेम करीत आहेत ती सुद्धां प्रशांत आहे. तिच्या ठायीं तेज आहे, पण तें मृदुल आहे. त्यांत कामुकतेचा व क्षुद्र विकारांचा अंशहि नाहीं. त्याच्या सान्निध्यांत माणसाच्या मनांत असलेल्या क्षोभकारक विचारांचा लय होऊन तें शांत व उदात्त होईल. अशा या सौंदर्याविषयींच्या प्रेमाला कवि अनन्यभावानें शरण गेला आहे व त्याच्यापुढें त्यानें भक्तीनें मस्तक अवनम्र केलें आहे.

बालकवि ज्या प्रेमाची आसक्ति धरीत आहेत, त्या प्रेमाचें हें असें

स्वरूप आहे. तें स्त्रीपुरुषांमधील अभिलाषेनें कलंकित झालेलें शारीरिक प्रेम नसून दिव्य व अतींद्रिय प्रेम आहे. हें दिव्य सौंदर्याच्या साक्षात्कारानें निर्माण झालेलें सात्त्विक व उपाधिरहित प्रेम आहे. जगतातील सर्व गोष्टी नाहींशा झाल्या तरी हें मंगल प्रेम अबाधित राहील. 'सृष्टि निमाली स्वर्गहि नुरले, प्रेम मात्र मंगलमय भरलें' हें ' मंगलमय प्रेमकथन ' या कवितेतील वचन कवीच्या मनोवृत्तीचें उत्कृष्ट द्योतक आहे.

आतां पुन्हां एकदां पूर्वीच्याच सिद्धांताकडे वळलें पाहिजे. स्वतःच्या जीवनांत जो आनंद नव्हता, जें प्रेम नव्हतें, तो आनंद व ते प्रेम यांची प्राप्ति करून घ्यावी याच उद्देशानें बालकवींनीं भोंवतालच्या क्षुद्र, दुःख-पूर्ण, स्वार्थी, सौंदर्यशून्य अशा मानवी जगताकडे पाठ फिरविली व निसर्गाशीं ते तादात्म्य पावले. हें तादात्म्य इतकें परिपूर्ण होतें कीं बाह्य जगाचा त्याना या तादात्म्याचा क्षणीं अक्षरशः पूर्ण विसर पडत असे. किंबहुना एका निराळयाच अलौकिक सृष्टींत ते अशा वेळीं वावरत असत.

निसर्गाशी इतकी विलक्षण तन्मयता दुसऱ्या कोणत्याहि मराठी कवी-मध्यें दिसावयाची नाहीं. वर्ड्स्वर्थ हा निसर्गगीतें लिहिणारा सर्वश्रेष्ठ कवि मानला जातो. पण त्याचीहि निसर्गाशीं असली तन्मयता झालेली नाहीं. निसर्गाचें वर्णन करीत असतां वर्ड्स्वर्थ स्वतःला पूर्णपणें विसरून जातो, व धुंद होतो असें दिसत नाहीं. तो जर बालकवींप्रमाणें स्वतःला पूर्णपणें विसरून धुंद व बेभान झाला असता तर निसर्गापासून पदोपदीं ज्ञान प्राप्त करून घेणें त्याला जमलेंच नसतें. इंग्रजीतील निसर्गकवींपैकीं कीट्सशीं मात्र बालकवींचें या तन्मयतेच्या आणि आत्मविस्मृतीच्या बाबतींत भरपूर साम्य आहे.

## निसर्गतादात्म्याची मानसशास्त्रीय मीमांसा

आतां आणखी एक महत्त्वाचा विचार. भोंवतालच्या दुःखपूर्ण जगतांत आपल्या मनाला विरंगुळा वाटणें शक्य नाहीं असें दिसून आल्यावर बालकवि निसर्गातून सौंदर्य, प्रेम, आनंद व शांति या गोष्टी मिळविण्याची

धडपड करूं लागले असें आपण पाहिलें. जगतापासून कुठें तरी दूर जाण्याच्या या मनोवृत्तीला escape म्हणतात. बालकवींची अशी वृत्ति कां झाली याची कारणपरंपरा आतांपर्यंत विस्तारानें सांगितली. परंतु मनोविश्लेषणशास्त्रज्ञांचें या कारणांनी समाधान होणें शक्य नाहीं. त्यांना हीं कारणें अगदीं अगदीं वरवरचीं वाटतील. निसर्गाशीं तन्मय होणाऱ्या व त्याची अनन्यभावानें उपासना करणाऱ्या कवींच्या मनाचें विश्लेषण कांहीं लेखकांनीं केलें आहे. हें विश्लेषण आपणांस मान्य होईलच असें नाहीं. कांहींना तें अतिरंजित वाटेल. परंतु निसर्गकवींच्या escape ची एक मीमांसा या दृष्टीनें त्याचा विचार करणें करमणुकीचें होईल.

आल्बर्ट मॉडेल या लेखकानें *The Erotic Motive in Literature* या आपल्या पुस्तकांत या प्रकारचें विश्लेषण केलें आहे. ‘ निसर्गप्रेम ’ या कल्पनेमध्यें जो अर्थ सामावलेला आहे अशी आपली सकृद्दर्शनीं कल्पना होते त्यापेक्षां विशेष खोल अर्थ तिच्यामध्यें आहे असें मॉडेलचें म्हणणें आहे. त्याची विचारसरणी पुढीलप्रमाणें आहे.——निसर्गामध्यें आपणांस मानवतेचें मर्म दिसलें आणि आत्मिक उन्नतीचा मार्ग सांपडला असें निसर्गपूजक कवि म्हणत असतात. कवींच्या या म्हणण्यांत तथ्य नाहीं असें नाहीं. परंतु कवींनीं आपल्या भावना प्रामाणिकपणें व्यक्त केल्या नाहींत असें म्हणावेसें वाटतें. कांहीं तरी तें लपवून ठेवीत असावेत असा संशय येतो. निसर्गोपासनेमुळें आपल्याला प्रेमाची स्फूर्ति प्राप्त झाली किंवा आपल्या जीवनांतील प्रेमाचा अभाव निसर्गाच्या सान्निध्यांत असतां आपल्याला तीव्रपणें जाणवला असें कांहीं कवींनीं म्हटलें आहे, आणि हें त्यांनीं सत्यकथनच केलें आहे. सर्व निसर्गकवींत श्रेष्ठ जो वर्ड्स्वर्थ त्याच्या काव्यांत शारीरिक प्रेमाच्या उत्कटतेचें आविष्करण जवळजवळ नाहीं म्हटलें तरी चालेल. वर्ड्स्वर्थच्या काव्यांतील प्रणयभावनेचा हा अभाव हॅझ्लिट्ला फार जाणवला. परंतु वर्ड्स्वर्थनें शारीरिक प्रेमाच्या आसक्तीचें प्रत्यक्ष वर्णन केलें नसलें तरी तिचें अस्तित्व त्याच्या काव्यांत

आहे यांत शंका नाहीं. स्त्रीच्या प्रेमाचें आकर्षण अथवा तिच्या विरहाची तीव्र जाणीव या गोष्टी निसर्गाच्या निकट सान्निध्यांतच सर्वांत अधिक प्रभावी असतात. प्रेम आणि निसर्ग यांच्यामध्यें अत्यंत जवळचें नातें आहे.* वयाच्या तिसाव्या वर्षापर्यंत ज्या प्रणयपूर्तीचा वर्ड्स्वर्थला अनुभव मिळाला नाहीं त्या प्रणयपूर्तीची आकांक्षा तो निसर्गसौंदर्याच्या वर्णनाच्या द्वारें उत्कटतेनें व्यक्त करीत होता. त्याचप्रमाणें गतकालांतील ज्या प्रेयसी-पासून तो दुरावलेला होता, तिची स्मृतिहि त्याच्या मनांत शल्यासारखी रुतलेली होती. आपल्या हृदयात खोलवर जाऊन दडलेली ही प्रणयभावना

---

* हें विधान वाचून कालिदासाच्या अभ्यासकांना 'मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्ति चेतः, कण्ठाश्लेषप्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे ?' या प्रसिद्ध वचनाची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं. 'श्यामास्वङ्गं चकितहरिणीप्रेक्षणे दृष्टिपातं, वक्त्रच्छायां शशिनि शिखिनां बर्हभारेषु केशान् । उत्पश्यामि प्रतनुषु नदीवीचिषु भ्रूविलासान्'. या मेघदूतांतील श्लोकांत हेंच मर्म आहे. तसेंच, 'रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान् पर्युत्सुको भवति यत्सुखितोऽपि जन्तुः । तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि ' या शाकुन्तलांतील श्लोकांत हेंच तत्त्व अंतर्भूत झालेलें आहे. टेनिसनच्या पुढील दोन कवितांमध्यें मॉडेलच्या वरील विधानाचें भरपूर प्रत्यंतर येईल.

*Tears, idle tears, I know not what they mean,*
*Tears from the depth of some divine despair*
*Rise in the heart, and gather to the eyes,*
*In looking on the happy autumn-fields,*
*And thinking of the days that are no more.*

*Dear as remembered kisses after death*
*And sweet as those by hopeless fancy feign'd*
*On lips that are for others; deep as love*
*Deep as first love, and wild with all regret*
*O Death in Life, the days that are no more.*

वर्ड्स्वर्थ वृक्ष, फुलें इत्यादींच्या सौंदर्याची प्रतीकें वापरून व्यक्त करीत आहे. प्रणयाची आसक्ति वृद्धिंगत करणें आणि त्याबरोबरच विमनस्कता उत्पन्न करणे या दोन्ही गोष्टी निसर्ग करीत असतो आणि हेंच त्याचें सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. इतकें विवेचन केल्यावर वर्ड्स्वर्थच्या उत्कृष्ट निसर्गगीतांचे रहस्य पुढीलप्रमाणें मॉडेलने सांगितलें आहे.—आपल्या अतृप्त प्रणयासक्तीची पूर्तता करून घेण्यासाठी वर्ड्स्वर्थने निसर्गगीतें लिहिलीं आणि त्या आसक्तीचे आविष्करण करण्यासाठीं त्यानें निसर्गातील प्रतीकें वापरलीं. आपल्या प्रणयविषयक तळमळीचे स्पष्ट शब्दांत आविष्करण न करिता किंवा प्रणयपूर्तीची काल्पनिक चित्रे न रंगवितां, किंवा औदासीन्य उघड रीतीने व्यक्त न करितां वर्ड्स्वर्थने निसर्गाविषयीची आपली अमर्याद आसक्ति कवनात व्यक्त केली आणि अशा रीतीने न कळत अंतःकरणांत खोल दडून बसलेल्या आपल्या भावनांना वाचा प्राप्त करून दिली.

मानवाला बोध करणें हेंच एक निसर्गाचें कार्य आहे अशी निसर्गाविषयींची उदात्त कल्पना ज्याच्या मनात आहे त्यांना आपलें हें विवेचन अतिरंजित वाटेल हे मॉडेलने कबूल केलें आहे. परंतु निसर्ग आणि मानव यांच्या सान्निध्याचे मानवावर जे विविध परिणाम होतात ते जमेस धरले असतां आपण मांडलेला सिद्धांत मान्य झालाच पाहिजे असे त्याचें प्रतिपादन आहे.

## मॉडेलच्या विवेचनावरील आक्षेप

मॉडेलच्या या विवेचनातील कांहीं मुद्दे अनेकांना अतिरंजित वाटतील यांत शंकाच नाहीं. अतृप्त प्रेमासक्तीवर रामबाण औषध म्हणून निसर्गाची उपासना करणें हा कदाचित एक हेतु असेल, किंवा प्रेमाचे स्फूर्तिस्थान या भावनेनेंहि निसर्गाकडे कोणी पाहत असतील. परंतु या दोन गोष्टींव्यतिरिक्त निसर्गोपासनेचा अन्य हेतूच असूं शकणार नाहीं काय ? ज्याच्या आयुष्यांत

प्रेमनिराशेच्या प्रसंग उद्‌भवलेला नाहीं अशा माणसाला वैषयिक प्रेमाचा विचार मनांतहि येऊं न देतां निसर्गाचें अवलोकन करतां येणें सर्वस्वी अशक्यच आहे काय? सृष्टीच्या बाल्यावस्थेंतील विकारानें कलंकित न झालेल्या कवींनीं आश्चर्यमूढ होऊन निसर्गगीतें लिहिलीं त्याच्यामागील हेतु कोणता असावा? आपल्या मनांतील गूढ प्रणयभावनेचा आविष्कार करण्यासाठीं त्यांनीं निसर्गाची उपासना केली व त्याचें स्तवन केलें असें म्हणतां येणें शक्य नाहीं. कोणतेंहि मानसिक अस्वास्थ्य नसतांहि अथवा कोणताहि व्यावहारिक हेतु मनांत न ठेवतांहि अविकृत मनानें निसर्गाच्या सौंदर्यांत मन रमविणें ही गोष्ट मुळींच अशक्य नाहीं.

## बालकवींच्या गीतांतील कामुकतेचा अभाव

आतां ही गोष्ट खरी की, औदासीन्यानें गांजलेला मनुष्य निसर्गाच्या सान्निध्यांत गेल्यावर त्याला विलक्षण समाधान प्राप्त होतें. आणि तो जर कवि असला तर ज्या निसर्गानें हें समाधान त्याला मिळवून दिलें त्याच्या सौंदर्याचें वर्णन तो करील व स्वतःला झालेल्या अपरिमित आनंदांत इतरांनाहि वांटेकरी करील. त्याचप्रमाणें हेंहि खरें आहे कीं, प्रत्येकाच्याच मनांत निसर्गसौंदर्याच्या अवलोकनानें दिव्य व उदात्त विचारांचें स्फुरण होईल असें मुळींच नाहीं. निसर्गाचें आकर्षक लावण्य पाहिल्यावर त्याच्या मनांत कामुकतेचे किंवा शृंगाराचे विचार निर्माण होणारच नाहींत असें कोणासहि निश्चयानें म्हणतां यावयाचें नाहीं. किंबहुना कांहीं कवींच्या मनांत निसर्गातील दृश्याच्या अवलोकनानें अतिरिक्त शृंगाराचीं किंवा कामुकतेचींच भडक चित्रें निर्माण होतात हें कालिदासाच्या मेघदूतांतील जीं उदाहरणें मागें दिलीं आहेत त्यावरून सहज स्पष्ट होईल. कीट्‌स आणि स्पेन्सर यांच्या निसर्ग-वर्णनांतहि अशीं कामुक वर्णनें आढळतात. आकाशांतील तारकेप्रमाणेंच आपल्यालाही स्थैर्य प्राप्त व्हावें अशी कीट्‌सची इच्छा आहे पण हें स्थैर्य त्याला कशासाठीं हवें आहे? हें वर्णन पहा—

No—yet still steadfast, still unchangeable
Pillow'ed upon my fair love's ripening breast,
To feel for ever its soft fall and swell,
Awake for ever in a sweet unrest.

बालकवींच्या निसर्गवर्णनांत असली मदिर दृश्यें येत नाहींत. याला कारण त्यांची मनोवृत्ति ! अलौकिक, दिव्य व शाश्वत अशा विश्वात्मक सौंदर्याच्या दर्शनानें त्यांच्या मनांत जे प्रेम निर्माण झालें आहे तें प्रेमहि तितकेंच अलौकिक, दिव्य, शाश्वत व माणसाचे हीन विचार नष्ट करून त्याला उदात्त बनविणारें आहे. ! *

## बालकवींची आत्यंतिक संवेदनशीलता

वस्तुजातामध्यें बालकवींना जें सौंदर्य प्रतीत झालें तें इतर कवींना प्रतीत होऊं शकलें नाहीं. याचें कारण बालकवींच्या ठायीं कांहीं विशेष सामर्थ्य होतें, आणि म्हणून सौंदर्याचा साक्षात्कार त्यांना त्वरेनें होत असे. एक प्रकारचा कांहीं विशेष हळुवारपणा त्यांच्या टायीं होता. एखाद्या निष्पाप बालिकेचें मन त्यांना प्राप्त झालें होतें. आनंदाची इवलीशी झुळूक आली तरी तें नाचूं लागे आणि दुःखाची अंधुक छटा येतांच ते कंपित होई व

* क्षणांत नष्ट होणाऱ्या चञ्चल सौंदर्याशी विरोधी असलेल्या दिव्य, आदर्श सौंदर्याचें वर्णन स्पेन्सरनें पुढीलप्रमाणें केलें आहे—

*For it is heavenly borne and cannot die,*
*Being a parcell of the purest skie.*
—*A Hymne in Honour of Beautie, V. 104—5.*

या असल्या दिव्य अतींद्रिय सौंदर्याच्या सान्निध्यांत प्रेमहि उदात्त बनतें.

*For love is lord of Truth, and Loialtie,*
*Lifting himself out of the lowly dust,*
*On golden plumes upto the purest skie,*
*Above the reach of loathly sinfull lust.*
—*A Hymne in Honour of Love. V. 176–9.*

काळवंडून जाई. किंबहुना तें इतकें मृदु होतें कीं सुखाचा अतिरेकहि त्याला असह्य झाला असता. वाऱ्याच्या मंद लहरीबरोबर डुलणाऱ्या एखाद्या नाजुक फुलाची जी अवस्था तीच त्यांच्या मनाचीहि होती. आत्यंतिक भावनावशता हें त्यांच्या जीविताचें सार आहे. अशीं माणसें अगदीं क्षुद्र कारणानें हर्षनिर्भर होतात आणि अगदीं क्षुद्र कारणानें उदासहि होतात. 'क्षणांत हसणें क्षणांत रडणें' असें या वृत्तीचें वर्णन करतां येईल. 'क्षणांत येतें सरसर शिरवें, क्षणांत फिरुनी ऊन पडे' ही मागें उद्धृत केलेली ओळ याच वृत्तीची द्योतक आहे. ही वृत्ति अजाण मुलाची किंवा भावनावश स्त्रीची § आहे आणि हीच वृत्ति बालकवींच्या सर्व निसर्ग-गीतांमध्यें ठायीं ठायीं दिसून येते. मला नेहमीं असें वाटतें कीं निसर्गाकडे तल्लीन होऊन पाहात असतां बालकवींना स्त्रीचें हृदय व स्त्रीचे नेत्र प्राप्त होत असावेत. याखेरीज इतकी कोंवळीक त्यांच्या गीतांत दिसली नसती. अनेक शब्द, शब्दसमूह आणि अनेक कल्पना याचा पुरावा देण्यास समर्थ आहेत. ही कोंवळीक आकर्षक आहे यांत शंका नाहीं. पण तिचा अतिरेक झालेला असल्यामुळें कठोरतेचें थोडेसें आस्तित्व अधिकच स्पृहणीय ठरलें असतें. चंद्रिकेचें कोंवळें तेज चांगलें खरें, पण तेंच नेहमीं वांट्याला आले तर त्यायोगें कदाचित् देव संतुष्ट होतील. परस्परविरुद्ध भावनांच्या प्रभावामुळें ज्यांचें जीवन गुंता-गुंतीचें झालें आहे अशा आपल्यासारख्या मानवांना सूर्याच्या प्रखर प्रकाशाचा ध्यास लागल्यावांचून राहणार नाहीं. पण नवपल्लवांची मृदुल शय्याहि ज्या इंदुमतीच्या अतिपेलव, कुसुमसुकुमार शरीराला खुपत असे तिला चिताधिरोहण कसें सहन होणार अशी शंका येऊन कालिदासाचा अज ज्याप्रमाणें दिङ्मूढ झाला आहे त्याप्रमाणें 'सौख्यातिरेकही पाहीं, दुःखाला कारण होई' अशी ज्याच्या मनाची अवस्था, त्या बालकवीला

§ "(कविता) एखाद्या मुग्ध मनोहर बालिकेप्रमाणें फुलांबरोबर खेळते......" असें खुद्द बालकवींचेंच वचन आहे.

जगतांतील दुःखद प्रसंगांची नुसती कल्पनाहि कशी सहन होऊं शकेल या विचारानें आपणसुद्धां दिङ्मूढ होण्याची शक्यता आहे. जाईजुईच्या फुलांवर कोणी उष्णोदकाचें सिंचन केलें तर काय होईल ! कमलपत्राच्या धारेनें कांटेरी वृक्ष तोडतां येईल काय ? बालकवींच्या बाबतींतहि असे प्रश्न विचारतां येतील. मृदुता, भावनावशता, हळवेपणा इत्यादि गोष्टी बालकवींच्या स्वभावांत ओतप्रोत भरलेल्या आहेत. त्यांच्या हृदयाचें दुकूलवस्त्र मृदुतम भावनांच्या आडव्या उभ्या धाग्यांनीं विणलेलें आहे आणि लुसलुशीत तृणांकुरांचा कोमलपणा त्यांत सामावलेला आहे. असल्या या पराकाष्ठेच्या मृदु हृदयामध्यें निसर्गाचें रमणीय दृश्य जेव्हां संक्रांत झालें तेव्हां तें पुढीलप्रमाणें त्यांच्या गीतांत सुकुमार लावण्य धारण करून प्रकट झालें—

'हिरवे हिरवे गार गालिचे — हरित तृणाच्या मखमालीचे
त्या सुंदर मखमालीवरती — फुलराणी ही खेळत होती.
गोड निळ्या वातावरणांत — अव्याज मनें होती डोलत
प्रणयचंचला त्या भ्रूलीला — अवगत नव्हत्या कुमारिकेला !
आईच्या मांडीवर बसुनी — झोके घ्यावे, गावीं गाणीं;
याहुनि ठावें काय तियेला — साध्या भोळ्या फुलराणीला !

## स्वप्नसृष्टीचें इंद्रजाल

भावनावशता, हळवेपणा, कोमलपणा इत्यादि गोष्टी ज्यांच्या स्वभावांत भिनलेल्या असतात अशीं माणसें बरींचशीं स्वप्नाळु असतात, स्वप्नसृष्टीचें इंद्रजाल त्यांना पराकाष्ठेचें मोहक वाटत असतें. बालकवींचेंहि असेंच झालें आहे. स्वप्नसृष्टींत सतत गुंगून कल्पनाजाल गुंफीत बसणें हें त्यांचें वैशिष्ट्य आहे. To dream and dream असें टेनिसनच्या *Lotus-Eaters* प्रमाणें बालकवींचेंहि ईप्सित आहे. ते स्वतःच जर सतत स्वप्नभूमीमध्यें विहार करीत आहेत तर त्यांच्या साध्या भोळ्या फुलराणीच्या नाजुक

नयनांवर निद्रेची गोड झांपड पडल्यावर तिला प्रणयाचें मधुर स्वप्न कां पडूं नये ?

त्या देवीला ओव्या सुंदर – निर्झर गातो; त्या तालावर
झुलुनि राहिलें सगळें रान – स्वप्नसंगमीं दंग होउन !
प्रणयचिंतनी विलीनवृत्ति – कुमारिका ही डोलत होती;
डुलतां डुलतां गुंग होउनी – स्वप्नें पाही मग फुलराणी.

वस्तुस्थिति अशी आहे कीं या क्षणी बालकवींचें मन फुलराणीच्या डोळ्यांनीं रम्य स्वप्नें पाहण्यांत दंग झालें आहे. या स्वप्नसृष्टींत बालकवींनीं एकदां प्रवेश केला म्हणजे जगतांतील व्यथा व वेदना वितळून जातात आणि फक्त संगीताच्या लकेरी तेवढया उरतात. स्वप्नसृष्टींतील मदिर आणि धुंद वातावरणाचें आणखी एक दृश्य पहा—

हळुवार हिमाचें अवगुंठन हलवोनी
गाईल सर्व निद्रिस्त विश्व डुलवोनी.
सारून जरा कचभार बालिका पाहे
एकेक तारका समाधिचे सुख लाहे.
निद्रिस्त भूमिला स्वप्न जणों हें दिसलें
स्वप्नांत लाडके सुंदर डोळे मिजले. $

## बालकवींच्या कल्पनाविलासाचें स्वरूप

बालकवींनीं निसर्गाचीं जीं दृश्यें चितारलीं आहेत तीं सत्यसृष्टींतील नसून सर्वस्वीं कल्पनासृष्टींतील आहेत. या बाबतींत त्यांच्यामध्यें व वर्ड्स्वर्थमध्यें फार मोठा फरक आहे. वर्ड्स्वर्थचीं निसर्गवर्णनें पूर्णपणें वास्तववादी असतात. निसर्गातील वस्तु ज्याला जशा दिसल्या तशाच त्यानें वर्णिल्या. त्यानें स्वप्नसृष्टींत प्रवेश केला नाहीं. निसर्गातील दृश्यें पाहण्याचें सामर्थ्य म्हणजे कल्पनाशक्ति ( Imagination ) असा त्याचा सिद्धांत आहे. या कल्पनाशक्तीला त्याच्या दृष्टीनें अर्थातच वास्तव जगांतील दृश्याकडे पाठ

$ पांखरांस

फिरवून स्वप्नसृष्टींत विहार करण्याचें मुळींच कारण नव्हतें. निसर्गांतील वस्तूंचें जें स्वरूप दिसेल त्याचें यथातथ्य वर्णन केलें म्हणजे वर्ड्स्वर्थचें समाधान होतें. कृत्रिम रूपकांची अथवा प्रतीकांची किंवा काल्पनिक दृश्यांची खैरात करून निसर्गवर्णनें सजविण्याचें कांहींहि कारण नाहीं असें वर्ड्स्वर्थचें स्पष्ट मत आहे. निसर्गांतील अगदीं साध्या वस्तूंच्या यथातथ्य वर्णनानेंहि फार मोटा परिणाम घडवून आणितां आला पाहिजे असा त्याचा आग्रह आहे. या शक्तीला वर्ड्स्वर्थनें Imagination हें नांव दिलें आहे; आणि वस्तुजाताच्या वास्तव रूपाकडे बुद्धया दुर्लक्ष करून आपल्या स्वतःच्या मनांतील भावनांचा अध्यारोप त्यांच्यावर करणें या प्रकाराला त्यानें Fancy हें नांव दिलें आहे. वर्ड्स्वर्थची पद्धति पूर्ण वास्तववादी आहे. वस्तुजाताचें अवलोकन केल्यानंतर ज्या गोष्टी प्रत्यक्ष दिसतील त्यांचेंच वर्णन करणें हें त्याचें ध्येय आहे. जी गोष्ट प्रत्यक्ष पाहिलेली नाहीं अथवा जिची अनुभूति कोणालाहि नाहीं तिचें वर्णन वर्ड्स्वर्थनें कधींच केलें नाहीं; आणि गोष्टी त्याला मूळ स्वरूपांत जशा दिसल्या तशाच, अविकृत अवस्थेंत त्याच्या काव्यांत संक्रांत झाल्या. आपल्या प्रतिभेच्या साहाय्यानें त्या गोष्टींवर अवास्तव आणि केवळ स्वप्नसृष्टींतील गोष्टींचें अवगुंठन चढवून त्यानें त्या अधिक रमणीय व आकर्षक करण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं. तात्पर्य, निसर्गांतील दृश्यें रंगवितांना त्याला सत्यसृष्टीशीं संबंध नसलेल्या काल्पनिक (Ideal) गोष्टींचा अथवा दृश्यांचा आधार घेण्याची थोडीसुद्धां जरूर भासली नाहीं. $

बालकवींचा कल्पनाविलास वर्ड्स्वर्थ ज्याला Fancy हें नांव देतो त्या प्रकारांत अंतर्भूत करावा लागेल. निसर्गांतील दृश्यांच्या वास्तवतेचा बुद्ध्या विपर्यास करून रुचिर काल्पनिक वातावरण त्यांच्या भोवतीं निर्माण करणें, आपल्या स्वतःच्या भावनांचा वस्तुजातावर आरोप करणें,

$ *Emile Legouis* कृत *William Wordsworth* या पुस्तकाच्या चवथ्या भागांतील तिसरें प्रकरण पाहावें.

वस्तूंच्या वास्तव स्वरूपाशीं ज्यांचा कोणताहि संबंध नाहीं अशा घटनांचें वर्णन करणें, सृष्टींतील विविध दृश्यांमध्यें व ध्वनींमध्ये गूढ अर्थ भरलेले आहेत अशी कल्पना करणें हीं या प्रकारच्या कल्पनाविलासाचीं वैशिष्ट्यें आहेत; आणि बालकवींच्या गीतांत हीं सारीं वैशिष्ट्यें प्रकर्षानें दिसून येतात. केवळ रमणीयतेकडे लक्ष देऊन सृष्टींतील वस्तूंचें वास्तवरूप आपल्या इच्छेप्रमाणें बदलून टाकण्याची करामत हा कल्पनाविलास करून दाखवितो. वैचित्र्यपूर्ण रूपकें, उत्प्रेक्षा व उपमा वापरून वाचकाचें मन तल्लीन करून टाकणें हें एकमेव कार्य अशा कल्पनाविलासाचें असतें. ज्यांच्या योगें जास्तींत जास्त संवेदनांची अनुभूति होऊं शकेल अशीं दृश्यें या प्रकारचा कल्पनाविलास निर्माण करीत असतो. परिणाम असा होतो कीं, निसर्गातील ज्या वस्तूचें वर्णन चाललेलें असेल तिच्या ठायीं आपलें चित्त केंद्रित न होतां ते काल्पनिक दृश्यांतच ( याला इंग्रजींत Imagery असें म्हणतात. ) खऱ्या अर्थानें केंद्रित होत असतें. याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून 'बाळें तीं खेळत होतीं' या कवितेकडे बोट दाखवितां येईल. या कवितेंतील पुढील ओळी विशेष विचारांत घेण्यासारख्या आहेत—

बैसून सूर्यकिरणांत । सोन्याच्या कारंज्यांनीं
कधिं जलदजाल खुलवावें । स्वर्गीय सुधेनें त्यांनीं
कधिं चंद्रकला सजवावी । नवरंगी हार विणोनी
शांतीचा करुनी पावा
अवकाशीं सूर भरावा
नक्षत्रलोक खुलवावा
सौंदर्ये उधळित होतीं । बाळें तीं खेळत होतीं.

एकदां सडा संध्येचा । शिंपून महोत्सव केला;
बनविलें बीन बाळांनीं । ओढूनि सूर्यकिरणाला
तें वाद्य वाजवायाला । अनिवार हर्ष हृदयाला

ते सांध्यगिरी बहुवर्णी
छायामय त्या निर्झरिणी
गजबजल्या सुरललनांनी
परिसाया देवहि येती । बाळें ती खेळत होतीं

वर्ड्स्वर्थची पद्धति व बालकवींची पद्धति यांमधील फरक या एका उदाहरणावरून पूर्ण स्पष्ट होईल. हें Realism नसून आत्यंतिक Idealism आहे. निसर्गांतील दृश्यांचें यथातथ्य अनुकरण करून वास्तववादी चित्र रेखाटणें हा कवीचा या ठिकाणीं हेतु नसून सर्वस्वी कल्पनारम्य चित्र रेखाटणें हाच त्याचा हेतु आहे.

निसर्गाच्या सौंदर्याचें वर्णन करीत असतां हिरवळ, फुलें, वेली, मंद वारा इत्यादींचें वर्णन कोणताहि कवि करील. पण केवळ स्वप्नसृष्टींतील दृश्य निर्माण करण्याची बालकवींची लालसा ‘ ताराराणी ’ या कवितेंतील पुढील ओळींत दिसून येईल.

निद्रिस्त नील वनमाला । निद्रिस्त सरोवर खालीं
वर मूक मोहनें जैसीं । शशिकिरणें विरघळलेलीं
इवलाच अधर हलवून । जल मंद सोडितें श्वास
इवलाच वेल लववून । ये नीज पुन्हां पवनास
निश्चित शांतिदेवीचा । किंचितसा चळुनी हाले
रोमांच कपोली भरती । कुंजांत कोकिळा बोले

घननील लतावलयांत । हिमधवल शिलातलमार्गी
चमकून मोहिनी झाली । जणुं कुंजकुंजनें जागी
सौंदर्य–भरीं भरलेलें । तारुण्य चढे रंगास
अलवार कोंवळें अंग । जाशि काय फुलांची मूस
धरि आम्रमंजिरी कानीं । हातांत जुईची वेणी;
कंठांत मालतीमाला । माधवीच भासे बाला.

हें दृश्य स्वप्नसृष्टींतील असले तरी यांतील कल्पनाविलास इतका उत्कृष्ट आहे कीं या दृश्यांतील प्रत्येक घटना अगदीं स्पष्टपणें डोळ्यांसमोर उभी राहते. स्वप्नाच्या धुक्यांत गुरफटलेले असूनहि हें दृश्य आपण स्वतः पाहत आहोंत असा भास आपल्याला झाल्यावांचून राहणार नाहीं. आणि बालकवींच्या कल्पनाविलासाचें हेंच वैशिष्ट्य आहे. या बाबतींत त्याचें शेलीच्या कल्पनाविलासाशीं साम्य दाखवितां येईल. *Epipsychidion* या शेलीच्या काव्यांतील पुढील ओळी असल्या कल्पनाविलासाचें उदाहरण म्हणून विचारांत घेण्यासारख्या आहेत. सौंदर्यदेवतेचें दर्शन आपणांस कोठें झालें हें सांगतांना कवि म्हणतो—

In the clear golden prime of my youth's dawn,
Upon the fairy isles of sunny lawn,
Amid the enchanted mountains, and the caves
Of divine sleep, and on the air-like waves
Of wonder-level dream, whose tremulous floor
Paved her light steps;-on an imagined shore,
Under the grey beak of some promontory
She met me, robed in such exceeding glory
That I beheld her not.

## कल्पनासुमनांचे झेले

तात्पर्य, बालकवि हे नेहमीं स्वप्नसृष्टींत दंग झालेले असल्यामुळें निसर्गाच्या रम्य दृश्यांमध्यें त्यांचीं सारीं स्वप्नें साकार झालीं. या स्वप्नसृष्टींच्या उन्मादक वातावरणात त्यांच्या कल्पनालतेला असंख्य धुमारे फुटतात, ती अत्यंत रमणीय फुलांनीं बहरते. आणि या फुलांचे शेवटीं झेले तयार होतात.-निसर्गांतील एखादें दृश्य पाहिल्यावर त्यांच्या डोळ्यांसमोर एक कल्पनाचित्र तत्क्षणीं तरळूं लागतें आणि थोड्याच वेळांत असल्या कल्पनाचित्रांची परंपराच तयार होते. हीं कल्पनाचित्रें बनावयास मुळींच वेळ लागत नाहीं. पावसाची सर यावी त्याप्रमाणें त्यांची सर येते.

कारंजांतून वेगानें जलबिंदु उफाळून वर यावेत त्याप्रमाणें त्यांच्या मनांतून या विविध कल्पना अत्यंत त्वरेनें अक्षरशः उफाळून वर येत असतात. प्राजक्ताच्या झाडावर अनंत फुलें फुलावीं आणि त्यामुळें तें भारावल्यासारखें व्हावें, त्याप्रमाणें अनंत कल्पनांनीं बालकवींचें मन मोहरून जाऊन तें भारावतें. आणि मग या भारावलेल्या मनांतून त्या कल्पना काव्यरूप धारण करून मूर्त होईपर्यंत त्यांना चैन पडत नाहीं. या त्यांच्या कल्पना विहार करावयास जातात त्या मानवांच्या सृष्टींत नाहीं, तर अप्सरांच्या आणि पऱ्यांच्या सृष्टींत! त्यांच्या प्रतिभेची जादू अशी कांहीं विलक्षण आहे कीं त्या जादूमुळें कोणत्याहि वस्तूचें क्षणार्धांत रूपांतर होतें व ती निराळीच दिसूं लागते. या सर्व वस्तु बालकवि आपल्याबरोबर अमरकन्यांच्या रमणीय उद्यानांत घेऊन जातात व तेथें त्या कल्पनांवर सौंदर्याचें नवीन लखलखीत पाणी चढतें. उदाहरणार्थ, 'संध्यारजनी' या कवितेंतील तारकांच्या आगमनाचें हें वर्णन पहा—

संध्येच्या खिडकींत येउनी ही हंसरी तारा,
हळुंच पाहते, खुणावितेही 'या—या' कोणाला?
पलिकडचा तो तेजोमय नव पडदा सारून
बघते, हंसते, क्षणांत लपते, ही दुसरी कोण?
लाजत लाजत असाच येइल सारा स्वर्लोक,
मुग्ध बालिका जमतिल गगनीं आतां नवलाख.

आतां कल्पनाविलासाच्या सौंदर्याचें हें भांडार पहा—

आली होती भरती, आता अस्त समुद्राला
त्या लाटांतुन काय सांडल्या या मौक्तिकमाला!
कल्पतरूचीं फुलें उडालीं कीं वाऱ्यावरतीं?
आकाशींच्या गंगेला कीं बुद्‌बुद हे येती?
नव टिकल्यांची चंद्रकळा कीं गगनश्री नेसे?
स्वर्गीचें भांडार उघडलें कीं रात्रीसरसें?
विश्वशिरावर टोप चढविला हिऱ्यामाणकांचा!

कल्पनेच्या या अवखळ प्रवाहाला जणूं कसलाहि अडथळा नाहीं. समुद्राच्या पृष्ठभागावर ज्याप्रमाणें लाटेमागून दुसरी लाट येते आणि लाटांच्या तांडवाला विसावाच नाही असें दिसतें, त्याप्रमाणें बालकवींच्या कल्पनांचें नर्तन कधींहि थांबणार नाहीं असें वाटतें. 'अरुण' या कवितेंत असल्या कल्पनांची कवीनें मुक्त हस्तानें खैरात केलेली आहे. आकाशांतील ढगांचे रंग जसे क्षणाक्षणाला बदलतात, त्याप्रमाणें बालकवींच्या कल्पना-विलासाचें सौंदर्य क्षणाक्षणाला निरनिराळीं रूपें धारण करून प्रकट होतें. आणि शेवटीं असंख्य लोलक लावलेल्या झुंबराप्रमाणें त्याची शोभा दिसूं लागते.

## रंगाची विलक्षण आसक्ति

बालकवींच्या निसर्गवर्णनांत आणखी एक वैशिष्ट्य आहे. रंगाची विलक्षण आसक्ति हें तें वैशिष्ट्य होय. दुसऱ्या कोणत्याहि आधुनिक मराठी कवीनें रंगाची असली अनिवार आसक्ति प्रकट केलेलीं नाहीं. निसर्गांतील विविध दृश्यांमध्यें व वस्तूंमध्यें दिसणाऱ्या रंगाच्या छटा बालकवींच्या चक्षुरिंद्रियावर जे संस्कार करतात तेच संस्कार काव्यरूप धारण करून प्रकट होतात. रंगाच्या बाबतींत बालकवींचें मन अत्यंत संवेदनशील आहे. त्यांच्या कवनांत रंगाचें जें उघळण झालें आहे त्याचा अभ्यास करण्यासारखा आहे यांत शंका नाहीं. निसर्गातील दृश्यांमध्यें दिसणाऱ्या रंगांच्या छटांचें तर ते वर्णन करतातच; पण रत्नांचे मनोहर रंग, वस्त्रांचे रंग यांचेंहि वर्णन करतात. रंगांच्या विविध छटांच्या बाबतींत इतकी विलक्षण आसक्ति केवळ बाणभट्टांच्या कादंबरींत व कालिदासाच्या मेघदूतांत दिसून येते. शेताचें वर्णन करीत असतां बालकवि एकदा म्हणतात— 'पुरा विनोदी संध्यावात डोलडोलवी हिरवें शेत.' शेताचें पुन्हां वर्णन करीत असतां ते म्हणतात— 'हीं पुढचीं पिवळीं शेतें सळसळती गातीं गीतें.' हिरवळीचें वर्णन करतांना तर तें खुषींत आल्यासारखे दिसतात. हें एक वर्णन पहा—

जा हलु हलु वळसे   घेत लपत छपत हिरवाळींत
पाचूचीं हिरवीं रानें   झुलव गडे झुलुझुलु गानें. ‡

या ठिकाणीं हिरवळीची पाचेच्या हिरव्या रंगाशीं तुलना केली आहे. फक्त गर्द हिरव्या रंगाचीच संवेदना येथें अभिप्रेत आहे. परंतु रत्नाच्या तेजस्वी रंगाच्या जोडीला हिरवळीच्या अत्यंत कोंवळ्या लुसलुशीतपणाची भर पडल्यास तें अधिक आकर्षक होईल यांत शंकाच नाहीं. हिरवळ पाहिल्याबरोबर तत्क्षणीं तिच्या हिरवेगारपणाची जशी संवेदना जागृत होते तशीच पूर्वीच्या प्रत्यक्ष-अनुभूतीवर आधारलेली तिच्या विलक्षण कोवळे-पणाची व लुसलुशीतपणाचीहि जाणीव होत असते. ही निर्भेळ संवेदना ( sensation ) होय.

'हिरवे हिरवे गार गालिचे—हरित तृणाच्या मखमालीचे '* या ओळांत हिरवळीच्या मोहक हिरव्या रंगाची संवेदना आहे, त्याचप्रमाणें मृदु स्पर्शा-चीहि संवेदना आहे. उंची काश्मीरी गालिचाची लव अथवा हिरव्यागार उंची मखमलीची लव यांच्या स्पर्शाची संवेदना कवीनें या ओळींत व्यक्त केली आहे. अशा रीतीनें नेत्र व स्पर्श या दोन इंद्रियांचें या ठिकाणीं तर्पण झालें आहे. हिरवळीच्या लुसलुशीतपणाचा आणखी एक उल्लेख आला आहे.

चोहिंकडे लसलशित बहरल्या हिरवाळी छान. ×

बालकवींना एकंदरींत लुसलुशीत हिरव्यागार हिरवळीचें आकर्षण विशेषच आहे असें दिसतें. 'मेघांचा कापूस' व 'औदुंबर' या कवितांमध्येंहि हिरवळीच्या दृश्यानें होणाऱ्या संवेदनेचें वर्णन आलें आहे.

संध्यासमयीं आकाशांत पश्चिमक्षितिजावर तांबूस रंगाच्या ज्या अनंत नयनमनोहर छटा दिसतात, त्यांचेंहि बालकवींना मोठें आकर्षण आहे. पण प्रत्यक्षांत मात्र बालकवींनीं संध्याकालीन रंगच्छटांतील फक्त एकाच छटेचा—सुवर्णाच्या रंगाचा—उल्लेख केला आहे.

---

‡ निर्झरास.   * फुलराणी   × अष्टदिशांचा गोफ

सांज खुले सोन्याहुनि पिवळें हें पडलें ऊन *

या ठिकाणीं सोन्याच्या तेजस्वी वर्णाचा उल्लेख आहे. ही तांबूस पिवळ्या वर्णाची छटा आहे.

बैसून सूर्यकिरणांत । सोन्याच्या कारंजांनीं
कधिं जलद्जाल खुलवावें । स्वर्गीय सुधेनें त्यांनीं
कधिं चंद्रकला सजवावी । नवरंगीं हार विणोनी +

या ठिकाणींहि सुवर्णाच्याच छटेचा उल्लेख आहे. 'एकदा सडा संध्येचा शिंपून महोत्सव केला' § या ओळींत तर कोणत्याच रंगाचा स्पष्ट उल्लेख नाहीं. त्याचें असें आहे कीं, संध्याकाळीं आकाशांत तांबड्या रंगाच्या अनंत विविध छटा दिसत असतात. 'The redness of flames has become the redness of roses' असें किंग्लेकनें ‡ वर्णन केलें आहे. किंग्लेकला लाल गुलाबाचा रंग आकाशांत दिसला तर नुकत्याच उमललेल्या गर्द तांबड्या जास्वंदीच्या फुलाप्रमाणें कालिदासाला सांध्यतेज दिसलें. $ टी. कॅंबेल crimson-coloured even असें वर्णन करतो; आणि the purple even असें शेली वर्णन करतो. बालकवींनीं एका ठिकाणीं कुंकुमरसाच्या वर्णाचा उल्लेख केला आहे.

स्वर्गीचे नव लेख कुंकुमरसें ती सांध्यदेवी लिही. †

बालकवींनीं संध्यासमयीं पश्चिमक्षितिजावर दिसणाऱ्या तेजस्वी वर्णाच्या फार छटा दाखविल्या नसल्या तरी मेघांचें वर्णन करीत असतां त्यांनीं रंगांच्या विविध छटा दाखविल्या आहेत.

फिकट निळीनें रंगविलेला कापुस मेघांचा
वरुनि कुणी गुलजार फिरविला हात कुंचल्याचा

* अष्टदिशांचा मोफ + बाळें तीं खेळत होतीं.

§ बाळें तीं खेळत होतीं. ‡ *Eothen*

$ सांध्यं तेजः प्रतिनवजपापुष्परक्तं दधानः । मेघदूत † प्रेमलेख

त्यांतहि हंसली मंदपणें ती चंद्रकला राणी
कडेकडेच्या मेघावर ये मोत्यांचें पाणी §

मेघ विरळ असल्यामुळें ते कापसाप्रमाणें दिसत आहेत. हा मेघांचा कापूस फिकट निळ्या रंगाचा असून त्यावर कुसुंबी रंगाची नाजुक छटा आली आहे, आणि मोत्यांच्या शुभ्र तेजस्वी रंगानें त्या मेघांच्या कडा सारविल्यासारख्या दिसत आहेत. फिकट निळा, कुसुंबी आणि मोत्यांच्या पाण्या-प्रमाणें शुभ्र अशा तीन रंगांच्या छटा कापसाप्रमाणें विरळ मेघांवर पडल्यावर त्यांना मोहक सौंदर्य प्राप्त झाल्यास नवल नाहीं. बालकवींच्या या वर्णनाची शेलीनें केलेल्या सायंकालीन मेघाच्या वर्णनाशी तुलना करून पहावी.

—as clouds of even,
Flecked with fire and azure, lie
In the unfathomable sky *—

मेघांच्या रंगांचें वर्णन करून बालकवि थांबले नाहींत. भोंवतालच्या पर्वतांचा निळा रंग, दरीमधून वाहणाऱ्या प्रवाहाचा शुभ्र रंग आणि जिकडे तिकडे पसरलेल्या हिरवळीचा हिरवा रंग यांचेंहि वर्णन त्यांनीं केलें आहे.

इंद्रनिळाचा रंग बहरवी गिरिच्या अंगाला
मधुन जळाची शुभ्र शोभते ती मोहनमाळा
चौंबाजूला थाट दाटला हा हिरवाळीचा. §

संध्याकाळच्या वेळीं पश्चिम आकाशांत दिसणाऱ्या रंगांचें, मेघांचें, आणि पर्वत, नदी, कुरणें इत्यादींमध्यें दिसणाऱ्या रंगांचें बालकवींनीं जसें वर्णन केलें आहे तसेंच प्रभातकाळीं पूर्वक्षितिजावर तरळणाऱ्या अनेक रंगछटांचेंहि वर्णन त्यांनीं केलें आहे. हें वर्णन बव्हंशीं संध्याकालीन रंगांच्या वर्णनासारखेंच असलें तरी त्यांत थोडेसें निराळेंपण भासमान होईल.

---

§ मेघांचा कापूस

* *Written in the Euganean Hills, 38–40*

§ मेघांचा कापूस

पूर्वसमुद्रीं छटा पसरली रम्य सुवर्णाची
कुणीं उधळली मूठ नभीं ही लाल गुलालाची ?
पूर्व दिशा मधु मृदुल हासते गालींच्या गालीं. ‡

या वर्णनांत सुवर्णाचा रंग आला आहेच, पण विशेष गोष्ट अशी कीं येथें तांबड्या रंगाची आणखी एक छटा दिसेल. गुलालाचा लाल रंग हें येथें नावीन्य आहे. आणखी एक मोहक नावीन्य येथें आढळेल. पूर्व दिशेच्या गालावर स्मिताची आकर्षक लालसर छटा कवीला दिसली आहे. लावण्यवतीच्या जाईजुईप्रमाणें शुभ्र व मृदुल गालावर फिकट गुलाबी रंगाची छटा तरळून तिचें तांबूस गुलाबाच्या रंगांत क्षणार्धांत रूपांतर झालें म्हणजे जें मोहक सौंदर्य प्रकट होतें ते तपाशिलानें कवीच्या लक्षांत आलेलें नसलें तरी प्राचीच्या वदनावरील आरक्त छटा त्याच्या नजरेतून निसटलेली नाहीं. रमणीच्या गालांवरील रंगछटाच्या मधुर मिश्रणाचें वर्णन कांहीं इंग्रजी कवींच्या कवितांतून नमुन्यासाठीं येथें उद्धृत करावयाचा मोह आवरत नाहीं. शेक्सपियरच्या आसपास होऊन गेलेल्या ग्रीन नामक कवीनें केलेलें शुभ्र व तांबूस वर्णांच्या मिश्रणाचे हें वर्णन पहा—

Her cheeks like ripened lilies steeped in wine,
Or fair pomegranate kernels washed in milk,
Or snow-white threads in nets of crimson silk,
Or gorgeous clouds upon the sun's decline.

स्पेन्सरनें हा रक्तिमा पुढीलप्रमाणें वर्णिला आहे—

That same goodly hew of white and red
With which the cheeks are sprinkled—×

' फेअरी क्वीन ' नांवाच्या काव्यांत पुढील वर्णन स्पेन्सरनें केलें आहे.

And in her cheeks the vermeill red did show
Like roses in a bed of lilies shed §

---

‡ अरुण

× *A Hymne in Honour of Beautie, V. 92–3*

§ *The Faerie Queen, ii canto 3, st. 22.*

विषयांचें त्यांना अभिप्रेत असलेलें वैचित्र्य आपणांस दिसत नाहीं. त्यांच्या कवितांमध्यें प्रामुख्यानें जे विषय आले आहेत ते अर्थातच रोमँटिक संप्रदायांत नेहमीं आढळणारेच विषय आहेत. उदाहरणार्थ, निसर्गाचें वर्णन, निसर्गाच्या सान्निध्यांत निर्माण होणाऱ्या वैयक्तिक अनुभूतींचें आविष्करण, ऐतिहासिक काळांतील दूरच्या रमणीय दृश्यांचें वर्णन या गोष्टी आपणास पुन्हा पुन्हा आढळतात. अज्ञेयवाद किंवा गूढगुंजन ही गोष्ट रोमँटिक संप्रदायांत वारंवार दिसते. केशवसुतांनीं लिहिलेल्या ‘ झपूर्झा ’ किंवा ‘ हरपलें श्रेय ’ या कवितांप्रमाणें बालकवींनीं गूढगुंजनात्मक कविता लिहिल्या नाहीत. त्यांच्या बऱ्याचशा कवितांमधून संशयग्रस्ततेची अवस्था मात्र दिसून येते. मानवी सृष्टीबाहेरील अतिमानुष ( supernatural ) घटना रोमँटिक कवींच्या कवितांमधून आढळतात. त्याचप्रमाणें ओसाड जागेचें व रात्रीच्या भयाणपणाचें वर्णन तन्मयतेनें करणें हेंहि आणखी एक वैशिष्ट्य रोमँटिक कवींच्या बाबतींत दिसून येतें. ‘ खेड्यांतील रात्र ’ या कवितेमध्ये भयानक काळोखांतील ओसाड जागेचें बालकवींनीं सुंदर वर्णन केलें आहे. एकंदरींत रोमँटिक कवींना रात्रीचें वेड विशेष दिसतें.+ यक्षिणी इत्यादि अतिमानुष व्यक्तींतहि अशा कवींचें मन रमतें व असले कांहीतरी गूढ वातावरण निर्माण करण्यांत त्यांना मोठें सुख वाटत असतें. ‘ दुबळी भूल ’ या कवितेंत बालकवींनीं असलें वातावरण परिणामकारक रीतीनें रंगविलें आहे.* अर्थात् एड्गर ॲलन पो या अमेरिकन रोमँटिक कवीच्या *The Raven* या कवितेची थोडीसुद्धां सर बालकवींच्या या कवितेला येणें शक्य नाहीं. केवळ या प्रकारची कल्पना पुसटपणें जिच्यांत आली आहे अशी एक कविता बाल-

---

+ *To Night* ही शेलीची प्रसिद्ध कविता व *A Sonnet to Night* हें ब्लँको व्हाइटचें सॉनेट या कविता उल्लेखनीय आहेत.

* या प्रकारचें गूढ वातावरण बालकवींनीं ‘ थडग्यांतील रमणी ’ या कवितेंत रंगविण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं.

कवींनीं लिहिलेली आहे येवढाच उल्लेख करावयाचा आहे. मरणाची उत्कंठा किंवा मृत्यूचा प्रभाव या गोष्टी रोमँटिक संप्रदायांतील कवींच्या काव्यांत नेहमीं दिसून येतात. बालकवींच्या कांहीं कवितांमध्यें मृत्यूचें आवाहन आहे ही गोष्ट पूर्वीं स्पष्ट केलीच आहे. अर्थात् एखादा तत्त्वज्ञ ज्या भावनेनें 'मृत्यु' या कल्पनेचा गंभीरपणें विचार करील ती भावना अशा कवींची नसते. आपल्या दुःखांचा अंत करणारी एक प्रभावी शक्ति याच एका दृष्टीनें ते मृत्यूच्या स्वरूपाचा विचार करीत असतात आणि म्हणूनच त्यांना मृत्यूचा ध्यास लागलेला मधून मधून दिसून येतो. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्वप्नें किंवा दिवास्वप्नें (day-dreams). रोमँटिक कवि यांत अगदीं तल्लीन होऊन जातात असें अनेक कवींच्या चारित्रांवरून दिसून येतें. स्वप्नाळू वृत्ति हें तर अशा कवींचें वैशिष्ट्यच मानावयास हरकत नाहीं. Was it a vision, or a waking dream ? असा जो प्रश्न कीट्सनें विचारला आहे त्यांतील मर्म हेंच होय. कोलेरिजची *Kubla Khan* ही कविता प्रसिद्धच आहे.

स्वप्नसृष्टीमध्यें विहार करण्यांत या प्रकारच्या कवींना कांहीं अलौकिक समाधान प्राप्त होत असतें. "'Tis a consummation Devoutly to be wished" असें हॅम्लेटप्रमाणेंच हे कवीहि म्हणत असावेत. बालकवींची वृत्ति पराकाष्ठेची स्वप्नाळू आहे हें आपण पूर्वीं अनेक वेळां पाहिलेंच आहे. स्वप्नसृष्टींतील किती तरी दृश्यें त्यांना सारखीं दिसत असतात. या स्वप्नसृष्टींत अमुक एक दिसूं शकणार नाहीं असें मुळींच नाहीं. स्वप्नच तें ! 'जादुगारीण' या कवितेंत × बालकवींनीं असेंच एक स्वप्न पाहिलें आहे. ही 'जादूची झोंप' आहे. ही कविता सोडून दिली तरी निसर्गगीतांत बव्हंशीं स्वप्नसृष्टीच बालकवींनीं रंगविलेली आहे असें दिसून येईल.

× ही कविता वाचल्यावर कांहींना कीट्सच्या *La Belle Dame Sans Merci* या कवितेच्या उत्तरार्धाची आठवण होईल.

## यमकानुप्रासांचीं बंधनें

काव्याच्या बहिरंगाविषयीं रोमँटिक संप्रदायांतील कवींचे कांहीं निश्चित विचार आहेत. परंपरागत संकेतांचा बडिवार न माजविणें व काव्यविषयक रूढ नियमांच्या चाकोरींतून बाहेर पडण्याची धडपड करणें हे त्यांचें शैली-बाबत महत्त्वाचें तत्त्व आहे. याविषयीं स्वतः बालकवींनीं पुढीलप्रमाणें विवेचन केलें आहे—“कविता पूर्ण स्वच्छंदी आहे. यमक, प्रास, चाल हीं कवितेचीं बंधनें आहेत. त्यांनीं तिचा देह शोभायमान दिसत असेल, पण प्रतिभेच्या वातावरणांत ती स्वैर विहार करीत असतां तीं तिला अडवून धरतात यांत शंका नाहीं. कवितेनें...अमुक यमकप्रासांचे दागिने अंगावर चढविले पाहिजेत, व अमुक वृत्तांत तिनें नाचलें पाहिजे......असें म्हणणें वेडेपणाचें आहे. ती वायूप्रमाणें स्वच्छंदी आहे; व स्वच्छंदीपणा हेंच तिचें ब्रीद होय. कवितादेवी कोणत्याहि पेंचांत कधींहि राहूं शकणार नाहीं.”ऽ या उताऱ्यांत यमक, प्रास, चाल, वृत्त इत्यादि बंधनांचा जाच कवितेला असतां कामा नये असें बालकवि म्हणत आहेत. या बाबतींत हें लक्षांत ठेवावयास पाहिजे कीं यमक व प्रास यांचीं बंधनें स्वतः बालकवि हौशीनें पाळीत आहेत. निर्यमक रचना करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला नाहीं. एखाद्या कवितेंत यमकाचा कांहींसा नवीन नमुना वापरतांना ते दिसतात हें खरें आहे. उदाहरणार्थ, ‘तडाग असतों तर—’ या कवितेंत एकंदर पांच कडवीं असून प्रत्येक कडव्याच्या पहिल्या तीन ओळींच्या अंतीं यमक साधलें आहे. चवथी ओळ मात्र पहिल्या तीन ओळींशीं यमकाच्या दृष्टीनें जमत नाहीं. तथापि प्रत्येक कडव्याच्या शेवटच्या ओळींत यमक साधलें आहे. याच प्रकारचें यमक ‘मधुयामिनी’ या कवितेंतहि दिसून येते. तथापि, पूर्ण निर्यमक रचना करण्याच्या भरीस मात्र बालकवि पडले नाहींत. तेव्हां यमकांचें बंधन झुगारून स्वैर व स्वच्छंद रचना करावयास पाहिजे हें आपलें मत बालकवींनीं कृतींत उतरविलें नाहीं. याचें एक महत्त्वाचें कारण असें

ऽ बालकवींची समग्र कविता (सं. प्रो. पाटणकर), प्रस्तावना पृ. २३

कीं बालकवींच्या मनावर नादमाधुर्याची मोहिनी फार मोठी होती; आणि संयत यमकांमुळें हें नादमाधुर्य आपोआप साधतें. आपल्या कल्पना-विलासाच्या स्वैर संचाराच्या आड यमकें येऊं शकत नाहींत हें लक्षांत आल्यावर निर्यमक रचनेचा हव्यास कशासाठीं धरावा असाहि विचार कदाचित् बालकवींच्या मनांत आला असेल. खरें पाहिलें असतां इंग्रजींत ज्यांना Sound-figures म्हणतात तीं 'नादचित्रे' काव्याचें सौंदर्य निःसंशय वृद्धिंगत करीत असतात. आणि यमकें म्हणजे दुसरें कांहीं नसून हीं नादचित्रेंच होत. काव्यसौंदर्याच्या दृष्टीनें यमकांचें हें महत्त्वाचें कार्य लक्षांत न घेणे खास हानिकारक आहे. यमकांचें कार्य शास्त्रीय पद्धतीनें स्पष्ट करण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि एक गोष्ट कधींहि विसरतां याव-याची नाहीं. ती ही कीं, कौशल्यानें साधलेलीं संयत अथवा मर्यादित यमकें काव्याचें सौंदर्य कधींहि बिघडवत नाहींत, उलट तें कितीतरी पटींनीं वाढवीतच असतात. अशा स्थितींत, 'यमकांचें बंधन नको,' असला विनाकारण आक्रोश करणारे कवि एकतर यमकांच्या ठायीं सामावलेल्या विविध सामर्थ्यांचें स्वरूप जाणून घेण्याच्या बाबतींत दुबळे असावेत, अथवा काव्यांतील सौंदर्योत्पादक तत्त्वें कोणतीं याचा त्यांना उमज पडत नसावा, किंवा चतुराईनें आकर्षक यमकें साध-ण्याची त्यांच्या ठायीं शक्तीच नसावी! यमकांचें बंधन झुगा-रून देऊन सर्वस्वीं निर्यमक रचना करण्याचा धीर बालकवींना झाला नाहीं याचें कारण यमकांत सामावलेल्या परिणामकारक नादमाधुर्याची त्यांना प्रतीति आली असली पाहिजे हेंच होय. जो प्रकार यमकांचा तोच प्रासांचा. अनुप्रासांच्या विविध छटामध्यें मनोहर सौंदर्य असतें हें नाकबूल करण्यांत कांहीं हशील नाहीं. अर्थात् कलात्मक अनुप्रासांच्या पुरतेंच हें विधान आहे हें कोणी विसरूं नये. कलात्मक अनुप्रास असूं शकतात आणि त्यांचें सौंदर्यहि आकर्षक असूं शकतें हें विसरणें युक्त नाहीं. प्रासांच्या बंधनाविरुद्ध तक्रार करणारे बालकवि स्वतःच अनेक ठिकाणीं अनुप्रास

साधतात. हे अनुप्रास सहजगत्या निर्माण होत असतील असेंहि म्हणवत नाहीं. या बाबतींत बालकवि जाणून बुजून कसबीपणा दाखविण्याची खटपट करीत असतात. उदाहरणार्थ, 'परि चंचल चळतें चपळहि चित्त कसें रे' * या ओळींतील अनुप्रास अगदीं सहजगत्या, विनायास साधला आहे असें कोणीहि म्हणूं शकणार नाहीं. 'शाहीर' या कवितेंत जवळजवळ प्रत्येक ओळीमध्ये सुरवातीस 'शूर वीर सरदार', 'धीर धिंग रणसिंग', 'राजबाळ वेल्हाळ' अशा पद्धतीचे अनुप्रास आहेत. 'नवरागरक्तिमा रंगे, रविरंजित रजनीवरती' या ओळीत ¶ अनुप्रास साधण्याची कवीनें अगदीं शिकस्त केलेली दिसत नाहीं काय ? तात्पर्य, बंधनें झुगारून देण्याचा डौल कवींनीं कितीहि आणला तरी नादमाधुर्याचा विचित्र मोह त्यांना स्वस्थ बसूं देणें शक्य नसल्यामुळें यमकें व अनुप्रास यांच्यावर बहिष्कार घालण्याच्या बाबतींत ते सर्वस्वीं दुबळे ठरतात. आणि उगाच आरडाओरडा करून यमक व अनुप्रास म्हणजे जणूं उंदीरघुशी होत अशी समजूत करून घेणाऱ्या कवींच्या ओळींतून काव्यांतील माधुर्य व त्यामुळें उत्पन्न होणारें सौंदर्य निघून तें दुसऱ्या एखाद्या चांगल्या वस्तींत रहावयास गेलें तर त्यांत अस्वाभाविक असें काय आहे ?

यांतील खरा मतलब असा आहे कीं, पूर्वींपासून चालत आलेल्या शैलीविषयक संकेतांविरुद्ध आणि बंधनांविरुद्ध बंड करावें अशी भाषा रोमँटिक कवि जरी तोंडानें बोलत असले तरी प्रत्यक्षांत मात्र आकर्षक शैलीचा मोह त्यांना सोडवत नाहीं आणि यामुळें शैली ज्यायोगें आकर्षक होऊं शकेल अशी प्रत्येक गोष्ट ते कसोशीनें करीत असतात. याचा परिणाम असा होतो कीं, या कवींच्या शैलीमध्यें जुन्या परंपरेंतील सर्व महत्त्वाच्या गोष्टी कायम राहतात. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेलेल्या Lamartine नांवाच्या प्रसिद्ध फ्रेन्च रोमँटिक कवीच्या बाबतींत नेमकें हेंच झालें. त्याच्या नंतर मात्र काव्याच्या बहिरंगांतहि महत्त्वाचे बदल

---

* हृदयाची गुंतागुंत ¶ प्रेमाचा पहिला भास

घडवून आणण्याची कोशीस रोमँटिक संप्रदायांतील कवि करूं लागले. अर्थात असे बदल घडवून आणूनहि आकर्षक शैलीचें सारें सौंदर्य कायम ठेवावयाचें अशीच त्यांची महत्त्वाकांक्षा होती. तथापि त्यांनी केलेले बदल फार मोठे क्रांतिकारक होते असे म्हणतां यावयाचे नाहीं. उदाहरणार्थ, वृत्तांच्या तापदायक बंधनाच्या वाटेस ते फारसे गेले नाहींत. कांहीं नवीन वृत्तें त्यांनीं वापरली हें खरें असलें तरी यमक, अनुप्रास इत्यादि किरकोळ बंधनें प्रत्यक्षांत झुगारून देण्याचा त्यांनीं काडीमात्र प्रयत्न केला नाहीं.

बालकवींच्या बाबतीत असेच झाले आहे. परंपरागत संकेतांच्या आणि नियमांच्या जाचाविरुद्ध तक्रार करूनहि प्रत्यक्षांत मात्र जुनीं अक्षरवृत्तें सोडून देऊन नवीन जातिरचनेचा उपयोग करण्याशिवाय रचनेच्या किंवा शैलीच्या बाबतींत त्यांनीं कांहींहि महत्त्वाचा बदल केला नाहीं. जातींच्या बाबतींतहि त्यांनीं १६ मात्रांच्या चार पांच जातींशिवाय इतर कोणत्याहि क्रांतिकारक किंवा नवीन रचनापद्धतीचा अंगीकार केला नाहीं. पांच सहा कविता त्यांनीं शार्दूलविक्रीडित वृत्तांत लिहिल्या आहेत.* केशवसुती सुनीतें त्यांनीं दोनच लिहिलेली आहेत.§ विविध वृत्तांचा उपयोग 'माझा लहानसा बाग' या एकाच कवितेंत त्यांनीं केला आहे. परंतु अक्षरवृत्तांवर त्यांचें काडीचें प्रभुत्व नाहीं ही गोष्ट या कवितेवरून ठसठशीतपणें दिसून येते. अत्यंत नीरस रचना कशी असूं शकेल याचा हा खरोखर आदर्श आहे.

रोमँटिक संप्रदायांत नेहमी दिसून येणाऱ्या आणखी कांहीं गोष्टी बालकवींच्या काव्यांत ठिकाठिकाणीं दिसून येतात. संवेदनाशील मन, स्वप्नाळूपणा या गोष्टी जशा त्यांच्या कवितांमधून आविष्कृत झालेल्या दिसतात, तशाच रंगाची आवड, नादमाधुर्याची आवड, लालित्यपूर्ण भाषेंतील भावनाविष्कार याहि गोष्टी दिसून येतात.

---

* १ माझा भारत; २ संशय; ३ संशय; ४ सौंदर्याचा अभ्यास कर; ५ प्रीति व कर्तव्य; ६ यडग्यांतील रमणी.

§ १ काल आणि जीवित; २ प्रेमलेख.

## व्यक्तिवादी दृष्टिकोन

रोमँटिक संप्रदायानें काव्याला नवीन वळण लावलें असें जेव्हां आपण म्हणतों तेव्हां काव्याविषयक कल्पना व काव्याचें बहिरंग या दोन क्षेत्रांत या संप्रदायांतील कवींनी घडवून आणलेला बदल आपण विचारांत घेत असतों. आणखी एक महत्त्वाचा बदल म्हणजे मनोवृत्तींतील अथवा दृष्टिकोनांतील बदल होय. आत्मनिष्ठा अथवा व्यक्तिवाद (Individualism) हा रोमँटिक संप्रदयाचा विशेष होय. केशवसुतांच्या काव्यांत या प्रवृत्तीचा ठिकठिकाणीं प्रभावी आविष्कार झालेला आहे. 'पूजितसे मी कवणाला तर मी पूजी अपल्याला' असे उद्गार* काढणारे केशवसुत स्वत:मध्यें आखिल विश्वाचें रूप पाहत आहेत. 'आम्हांला वगळा गतप्रभ झणीं होतील तारांगणें' हे केशवसुतांचे आत्मविश्वासाचे बोल § ज्याप्रमाणें आत्यंतिक आत्मनिष्ठेचे द्योतक आहेत त्याचप्रमाणें 'पुरें जाणतो मीच माझें बल' हे रेव्हरंड टिळकांचे बोलहि पराकाष्ठेच्या आत्मनिष्ठेचे द्योतक आहेत. व्यक्तीच्या सामर्थ्याविषयींचा हा दुर्दम्य आत्मविश्वास किंबहुना दर्पयुक्त आशावाद हा रोमँटिक संप्रदायाचा एक विशेष होय. हा निर्भेळ व्यक्तिवाद होय. या व्यक्तिवादाला क्वचित् अतिरंजित जल्पनेचें स्वरूप प्राप्त होतें असेंहि कांहींना वाटण्याचा संभव आहे. पण रोमँटिक कवींचा हा स्वभाव होय असें म्हटलें तरी चालेल. 'आत्मविश्वास' याच नांवाची बालकवींची एक कविता आहे. 'कां मग खंती जग सगळें माझ्या हातीं' अशी एक ओळ त्या कवितेंत आहे. 'कवि' या कवितेंतहि 'कवी हा, जगताचा धनी' ही याच प्रकारची कल्पना आली आहे. या ओळींतील कल्पना रोमँटिक मनाच्या प्रवृत्तीचीच द्योतक होय. † आत्मकेंद्रितता हा असल्या कवींचा स्वभावविशेष असल्यामुळें

---

* नवा शिपाई § आम्ही कोण ?

† *Arthur O'Shaughnessy* या कवीच्या पुढील ओळी पहाव्या—

*We are the music makers*
*And we are the dreamers of dreams*
*Yet we are the movers and shakers*
*Of the world for ever, it seems.*

औदासीन्य, विषण्णता इत्यादि भावना जशा यांच्या ठायीं दिसून येतात तशाच समाजाविरुद्ध बंडखोरपणाच्या छटाहि दिसून येतात. केशवसुत व शेली यांच्या काव्यांतून यांची प्रतीति येईल. या बंडखोर वृत्तीच्या पोटींच प्रेषितत्वाची जाणीव कवीला होत असते. कवि हा जगताचा प्रेषित आहे ही कल्पना शेलीच्या *Ode to West Wind* या सॉनेटमध्यें जशी दिसून येते तशीच केशवसुतांच्या 'आम्ही कोण ?' या सॉनेटमध्यें दिसून येते. औदासीन्य आणि बंडखोरपणा या दोन अगदीं परस्पर विरुद्ध वाटणाऱ्या गोष्टी अशा कवींच्या ठायीं एकसमयावच्छेदेकरून दिसून येतात. यामुळेंच

काळाचे कवि हे काळ, काळदिशा अमुचा खेळ !
तेजानें भरलीं अंगें ! नेऊं जगा तेजामागें !
हिमगिरिचा काढा कांटा, एकिकडे सागर लोटा—ऽ

असे पराकाष्ठेचे आत्मविश्वासपूर्ण उद्‌गार काढणारे बालकवि

आशा सरली प्रीति निमाली
नैराश्याची भयाण काळी
रजनी ही चहुंकडे पसरली
मार्ग सांपडेना त्यांत. †

यासारखे नैराश्यपूर्ण उद्‌गार काढतात यांतील मर्म आतां समजून येईल.

## कल्पनावाद

वस्तुजाताचें वर्णन करीत असतां वास्तववादाचा अवलंब न करितां कल्पनावादाचा ( Idealism ) अवलंब करणें हें रोमँटिक संप्रदायांतील कवींचें आणखी एक वैशिष्ट्य आहे. गोष्टी जशा असतात अथवा डोळ्यांना जशा दिसतात तशाच्या तशा आपल्या काव्यांत हे कवि संक्रांत करीत नाहींत. यांच्या कल्पनाचक्षूला गोष्टींचें जें रूप दिसतें त्याचेंच वर्णन हे करीत असतात. आपल्या वैयक्तिक भावनांचा

ऽ धर्मवीर † काय असे संसारांत !

आरोप इतरत्र करून आपल्या इच्छेशीं सर्वस्वीं जुळणारी कल्पनासृष्टि निर्माण करून ते एका विचित्र समाधानाचा आस्वाद घेत असतात. मानवी भावनांच्या क्षेत्रांत हे कवि आपल्या मनांतील भावना इतरांच्या कृतींमध्यें शोधण्याची व त्यानिमित्तानें स्वतःचें समाधान करून घेण्याची धडपड करीत असतात. त्याचप्रमाणें निसर्गांतील वस्तुजातांचें यथार्थ किंवा वास्तववादी वर्णन वर्ड्स्वर्थप्रमाणें करीत न बसतां निसर्ग यांच्या स्वतःच्या कल्पनासृष्टींत जीं विविध रूपें धारण करतो त्याच रूपांचें ते वर्णन करूं लागतात. आणि मग निसर्ग वस्तुतः जसा आहे तसा तो न दिसतां मानव-सृष्टींतील व्यक्ति कवीला निसर्गांत दिसूं लागतात. बालकवींनीं हा प्रकार सर्वत्र केला आहे. त्यांना फुलांमध्यें फुलराणी दिसते, त्या फुलराणीचा सूर्यकिरण या नवरदेवाशीं विवाह होतो, धुक्याचा अंतरपाट दूर होतो आणि प्रेयसीचें प्रियकराशीं मीलन होतें. हें सारें कल्पनाचित्र आहे. तें मोहक आहे यांत शंका नाहीं. पण प्रभातकाळीं सूर्योदय होत असतां उमलणाऱ्या फुलांचें सौंदर्य वर्णा-वयाचें इतकाच कवीचा हेतु नाहीं. निसर्गांत दिसणाऱ्या या रम्य दृश्याचा आधार घेऊन आणि मानवव्यक्तींचा व त्यांच्या मनोविकाराचा अध्यारोप निसर्गांतील वस्तूंवर अथवा दृश्यांवर करून सर्वस्वीं निराळें कल्पनाचित्र रंगविण्यांत बालकवींना जो आनंद होत असतो त्याला तोड नाहीं. मला नेहमीं असें वाटतें कीं आपल्या कल्पनासृष्टींमध्यें रेखारूपानें तयार झालेल्या चित्रांत रंग भरून तें परिपूर्ण व्हावें यासाठींच बालकवि निसर्गदृश्यांचा उपयोग करून घेत असावेत. निराळ्या शब्दांत सांगावयाचें झालें तर निसर्गांतील दृश्यांचें अवलोकन हें बालकवींना आपली कल्पनासृष्टि तयार करण्यासाठीं केवळ एक निमित्त ( stimulus ) असतें. एकदां हें stimulus त्यांना मिळालें कीं मग त्यांच्या दृष्टीसमोरून वास्तव निसर्ग अदृश्य होतो आणि कल्पनासृष्टींतील स्वप्नसदृश दृश्यें निर्माण होऊं लागतात. मागें विस्तारानें वर्णिल्याप्रमाणें वर्ड्स्वर्थच्या वास्तववादी निसर्ग-वर्णनांत व या बालकवींनीं केलेल्या वर्णनांत स्वरूपदृष्ट्या महदंतर आहे हें

बरवर पाहणाराला सुद्धां दिसून येईल. पण बालकवींच्या पद्धतीचा असा परिणाम अपरिहार्यपणें घडून येतो कीं प्रत्यक्ष निसर्गात कवीचें लक्ष्य केंद्रित होण्याऐवजीं तें निसर्गदृश्यांनीं सूचित केलेल्या काल्पनिक दृश्यांतच खरें केंद्रित होतें आणि कवि अशा कल्पनासृष्टींतच धुंदपणें विहार करूं लागतो. मनाची ही धुंद अवस्था निर्माण झाली म्हणजे भोंवतालीं खरोखर कोणत्या गोष्टी प्रत्यक्षपणें दिसत आहेत याचाहि विचार करण्याचें कारण कवीला पडत नाहीं; कारण त्याची कल्पनासृष्टि अगोदरच तयार झालेली असते. ही कल्पनासृष्टि निर्माण करण्याचें काम कविता करीत असते. अशी कल्पनासृष्टि तयार झाली कीं ती कवीला सत्यसृष्टीपेक्षांहि अधिक रमणीय भासूं लागते आणि त्या रमणीयतेंतच तो गुंगून जातो. बालकवींच्या पद्धतीचा हा अपरिहार्य परिपाक आहे. हें प्रत्यक्ष निसर्गतादात्म्य नसून निसर्गानें सूचित झालेल्या काल्पनिक दृश्यांशीं व त्या दृश्यांशीं संबद्ध असलेल्या धुंद स्वप्नसृष्टीशीं झालेलें तादात्म्य होय.आणि असें तादात्म्य एकदा परिपूर्ण झालें म्हणजे कवीचें मन दिक्कालांच्या आरपार निघून जातें व मग या मर्त्य जगाशीं त्याचा संबंध सुतराम् राहत नाहीं ! कविताशक्तीनें तयार केलेल्या या प्रकारच्या धुंद कल्पनासृष्टीचें वर्णन पाहावयाचे असल्यास कीट्सच्या पुढील ओळी वाचाव्या—

Away ! away ! for I will fly to thee,
Not charioted by Bacchus and his pards,
But on the viewless wings of Poesy,
Though the dull brain perplexes and retards:

I cannot see what flowers are at my feet
Nor what soft incense hangs upon the boughs,
But, in embalme'd darkness, guess each sweet
Wherewith the seasonable month endows—
The grass, the thicket, and the fruit-tree wild;*

---

* *Ode to a Nightingale*

कवित्वशक्तीच्या साहाय्याने कीट्सनें चित्रित केलेल्या या मदिर वातावरणाची धुंदी अनुभविल्यावर 'प्रतिभेच्या सौधावरुनी, मरुद्गणावरती चढुनी' बालकवींनीं ताराराणीचें जें वर्णन केलें आहे, अथवा शेलीनें सौंदर्यदेवतेच्या भेटीच्या प्रसंगाचें जे वर्णन केलें आहे तें वाचकांनीं पुन्हा एकदा वाचावे.+ निसर्गातील दृश्यांचे अवलोकन केल्याबरोबर बालकवींच्या मनांत ज्या विविध कल्पना तरळून जातात त्या कल्पनांना शरीर प्राप्त झालें आणि मनोविकारांचा त्या शरीराशीं संयोग झाला म्हणजे 'ताराराणी'—सारखीं रुचिर कल्पनादृश्यें निर्माण होत असतात. कवीनें आकाशांत तारका पाहिली. त्या तारकेचें सौंदर्य पाहिल्यावर मनाची जी बेभान अवस्था झाली त्या अवस्थेंत ती तारका रसरसलेल्या सौंदर्यानें मुसमुसलेली मोहिनी आहे असा कवीला भास झाला; आणि असा भास झाल्याबरोबर स्वप्नसृष्टींतील चित्रांत विविध मनोरम रंग क्षणार्धांत भरले. ती तारका अदृश्य होऊन तिच्या जागीं कोणी रंभा किंवा ऊर्वशी कवीला दिसल्याबरोबर

किति होत नाच नयनाचा। किति रंग मुखावर आले

हे वर्णन ओघानेंच आलें.

निसर्गाचें वर्णन करीत असतां वर्ड्स्वर्थनें अवलंबिलेली वास्तववादी पद्धति आणि कीट्स, शेली, किंवा बालकवि यांच्यासारख्या रोमँटिक कवींची कल्पनावादी पद्धति यांमधील मूलभूत भेद स्पष्ट करण्यासाठींच इतका विस्तार करावा लागला. निसर्गवर्णनांत अतिरिक्त कल्पनावादाचा बालकवि सर्वत्र जो अवलंब करतात त्या कल्पनावादाचें हें असें स्वरूप आहे.

## दौर्बल्याची तीव्र जाणीव

शेली आणि कीट्स—विशेषतः शेली—यांच्या काव्यांत जी दौर्बल्याची जाणीव ठायीं ठायीं दिसून येते तीच दौर्बल्याची जाणीव बालकवींच्या

---

+ मागें पृष्ठ ५७ पहावें

कवितांतहि दिसून येते. आपलें दौर्बल्य व्यक्त करणें हें अनेक धीराच्या लोकांना तिरस्करणीय वाटेल यांत शंका नाही. परंतु बालकवींसारख्या कवींचा हा स्वभावधर्मच असल्यामुळें त्याचा आविष्कार त्यांच्या कवनांतून होणें अपरिहार्य असतें. "पंख तुटुनिया विव्हल पडलों मी धरणीवरती!"§ असे केविलवाणे उद्‌गार काढणाऱ्या कवीनें—

परिस्थितिचीं कठोर भूतें
क्षणांत करिती शून्य मनातें.
पूर्वस्मृति मग ताजी होते
जळते त्यांत। हृदयाचे होउनि भूत ऽ

यासारखे आपल्या असहायतेचे उद्‌गार काढावेत यांत कांहींच नवल नाहीं. ही दुर्बलतेची जाणीव केशवसुतांनीं व्यक्त केली आहे. गडकऱ्यांनींहि व्यक्त केली आहे. चित्ताच्या या दुर्बलतेबद्दल त्याना कोणीहि सहज नांवें ठेवूं शकेल. पण त्यांच्या स्वभावांतील हें मूलभूत वैशिष्ट्य असल्यामुळें आणि हे सर्व कवि पूर्णपणें आत्मनिष्ठ असल्यामुळें या वैशिष्ट्याचा आविष्कार कोणत्या तरी प्रकारानें त्याच्या काव्यांत होणारच. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी त्यांनीं पुनः पुनः ही दौर्बल्याची जाणीव व्यक्त केली असतांहि आपल्याला त्यांच्याविषयीं एक प्रकारचें विचित्र आकर्षण वाटत असतें हें नाकबूल करतां येणार नाहीं. आपण कवीला त्याच्या सर्व उणीवांसह पतकरण्याचें ठरवलें तरच या दौर्बल्याची आपण थट्टा करणार नाहीं. नाहीतर पूर्ण व्यावहारिक दृष्टीनें पाहिलें असतां या प्रकारचें दौर्बल्य उपहासास्पदच ठरेल अशी भीति वाटते. परंतु रोमँटिक कवींच्या स्वभावांत परस्परविरोधी भावनांचें अथवा प्रवृत्तींचें अस्तित्व

§ अष्टदिशांचा गोफ

*I pant, I sink, I tremble, I expire,* या शैलीच्या प्रसिद्ध ओळीची बालकवींच्या वरील ओळीशी तुलना करावी.

ऽ यमाचे दूत

नेहमीं दिसून येतें हें आपण मागें पाहिलें आहे. क्षणांत आनंद,क्षणांत दुःख, क्षणांत दर्पोद्धत आवेश,तर क्षणांत आपल्या आत्यंतिक असहायतेची जाणीव या गोष्टी आपल्यासारख्या व्यावहारिक माणसांच्या दृष्टीनें कितीहि उपहासास्पद ठरल्या तरी या विरोधी भावना एकसमयावच्छेदेंकरूनहि कांहीं भावनाप्रधान माणसांच्या ठायीं दिसून येतात हेंहि खरें आहे. आणि बालकवींच्या जातीचे जे कवि असतात त्यांचा तर हा स्वभावधर्मच असतो. याला त्यांचा कांहींहि इलाज नाहीं !

## केशवसुत, टिळक व गडकरी यांचीं निसर्गगीतें

रोमँटिक संप्रदायांतील कोणतीं वैशिष्ट्यें बालकवींच्या काव्यांत दिसून येतात याचा आतांपर्यंत विस्तारानें आढावा घेतला.तथापि निसर्गगीतें व औदासीन्यानें भरलेलीं कवनें हीं बालकवींच्या काव्याचीं प्रमुख वैशिष्ट्यें होत. त्यांतहि निसर्गप्रेम, निसर्गोपासना, निसर्गसौंदर्याचा साक्षात्कार हेंच बालकवींचें खरें क्षेत्र होय. निसर्गगीतें लिहिण्याची बालकवींनीं जी पद्धति अवलंबिली ती मराठी काव्याच्या प्रांतांत सर्वस्वीं नवीन आहे यांत शंका नाहीं. रोमँटिक संप्रदायांतील अनेक गोष्टी केशवसुत, गडकरी, व तांबे यांच्या काव्यांत येतात. पण निसर्गवर्णनाच्या बाबतींत बालकवि पूर्णपणें स्वतंत्र वृत्तीचे आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. निसर्गगीतें लिहिणारे पहिले आधुनिक कवि केशवसुत हे होत. परंतु केवळ निसर्गसौंदर्याचें तन्मयतेनें वर्णन करणें हा त्यांच्या निसर्गगीतांचा हेतु दिसत नाहीं. निसर्गाचें वर्णन करीत असतां मानवजातीच्या दुबळेपणाचे, अपूर्णतेचे, दुःखपूर्णतेचे विचार केशवसुतांच्या मनांत प्रबल होत असतात; आणि निसर्गाचें वर्णन चालू असतांच मानवी जगतांतील या विविध व्यथांचें ते आविष्करण करूं लागतात. मानवाचें पूर्वीचें तेज आतां लयाला गेलें असून त्याच्या शापालाहि किंमत नाहीं आणि त्याच्या आशीर्वादालाहि कांहीं किंमत नाहीं; त्याचे शब्दहि त्याच्याप्रमाणेंच निस्तेज झाले आहेत; म्हणून सोसाट्याच्या वाऱ्यानें

उत्पन्न केलेल्या भोंवऱ्यांत त्यांना टाकून दिलें तर ते स्वर्गास चढतील आणि स्वर्गाच्या वातावरणांत ते निस्तेज शब्द पुनरपि तेजस्वी होतील असा विचार $ 'वातचक्र' या कवितेत आला आहे. मानवी जीवनांतील वैगुण्यांचें आविष्करण करण्यासाठी वातचक्र हें कवीला केवळ निमित्त मिळालें आहे यांत शंका नाही. नुसत्या वातचक्राचे–वावटळीचे–कलात्मक वर्णन करून थांबणें हा कवीचा हेतु नसून वातचक्राच्या निमित्तानें मानवी जीविताविषयींचे आपले विचार प्रकट करणें हाच त्याचा हेतु आहे. वाऱ्याबरोबर तरंगणारी 'म्हातारी' पाहिल्याबरोबर आपलें प्रौढ वय चिन्ताग्रस्त आहे व आपल्याला स्वैरविहार करण्याचें सामर्थ्य नाहीं याची केशवसुतांना जाणीव झाली आणि मुग्ध बाल्य पुन्हां प्राप्त व्हावें अशी तळमळ त्यांना लागली. 'मज वय विसरूं दे, मुग्ध–मधु–बाल्यीं उतरूं दे' अशी मनीषा त्यांनीं प्रकट केली. भृंगाचें गाणें हें प्रत्यक्ष सृष्टीचें गीत असून मानवी जगतांतील कवि असलें दिव्य गीत कधींच गाऊं शकणार नाहीत, त्यांचें गाणें दुःखपूर्णच असणार, केवळ गणमात्रा जुळविणें हेंच त्यांचे एकमेव कार्य असतें इत्यादि विचार 'भृंग' या कवितेंत केशवसुतांनीं व्यक्त केले आहेत. येथेंहि सृष्टीचें आनंदपूर्ण रूप व मानवाचें उदास, दुःखपूर्ण जीवन यांमधील आत्यंतिक विरोध व्यक्त करणें हाच केशवसुतांचा हेतु आहे. हाच विचार 'पुष्पाप्रत' या कवितेंत कितीतरी अधिक प्रभावी रीतीनें केशवसुतांनीं प्रकट केला आहे. पुष्पाचें सौकुमार्य, माधुर्य, त्याचें चिरतारुण्य आणि मानवाचें अनेक भयाण दुःखांनीं कांठोकांठ भरलेलें जग यांतील असह्य विरोध हाच या कवितेचा मुख्य विषय आहे. आपलें जग भयाण काळोखानें भरलेलें असून, मृत आशांच्या चितांवरून आपलें पिशाच घिरट्या घालीत आहे– आणि पुष्पाचें सौंदर्य, त्याचें यौवन

$ शेलीच्या ***Ode to West Wind*** या कवितेतील पुढील कल्पना पहावी-
*Drive my dead thoughts over the universe*
*Like withered leaves to quicken a new birth !*

अकलंकित आहे हा विरोध केशवसुतांना सहन होण्यासारखा नाहीं. तात्पर्य, निसर्गाचें सौंदर्य व मानवी जीवनाची विरूपता, दुःखपूर्णता यांमधील विरोध व्यक्त करण्यासाठीं व मानवी जीवनाविषयीं आपले विचार सांगण्यासाठींच वर उल्लेखिलेल्या कविता केशवसुतांनीं लिहिल्या. निसर्गाचें केवळ कलापूर्ण वर्णन करण्यांत धन्यता मानणें हें केशवसुतांचें उद्दिष्ट नव्हतें. आणि ज्यांना निसर्ग–गीते हें नांव देतां येईल अशा ज्या थोड्याच कविता केशवसुतांनीं लिहिल्या त्यामध्ये वरील कविता प्रमुख होत. ‘ फुलांचे कवि ’ असें ज्यांचें बिरुद त्या रेवरंड टिळकांनी तर ‘ वनवासी फुला’ला मानवांच्या जगतांतील कापट्य, स्वार्थ, क्षुद्र विषयवासना इत्यादि विषयावर विद्वत्ताप्रचुर व्याख्यान द्यावयास लाविलें आहे. गडकऱ्यांनीं ‘अरुण’ या कवितेंत अरुणोदयाच्या वेळच्या गहिऱ्या रंगछटांचें तन्मयतेनें वर्णन करण्याचा देखावा करून अनंत उत्प्रेक्षांचा सडा शिंपला आहे.‘प्रेमपाठ’ या कवितेंत बालकवींच्या ‘ फुलराणी ’चाच अवतार झालेला दिसेल. उषा ही वधू, लता या करवल्या, सूर्य हा नवरदेव; आणि उषा व रविकर यांचा विवाह हीच कल्पना गडकऱ्यांनीं बालकवींच्याच पद्धतीनें विस्तारली आहे. पण सर्वस्वी बालकवींच्या पद्धतीनें लिहिलेली गडकऱ्यांची ही एकच कविता होय. त्यांनीं केशवसुताप्रमाणे निसर्ग व मानव यांमधील आत्यंतिक विरोध प्रभावी रीतीनें व्यक्त केला नाहीं; अथवा टिळकांप्रमाणें निसर्गाकडून मानवाला बोध करविला नाहीं किंवा वर उल्लेखिलेल्या कवितेचा अपवाद सोडून दिला तर बालकवींप्रमाणें निसर्गांतील दृश्यांवर चैतन्यारोप करून व निसर्गांतील वस्तु या मानवी भावना असलेल्या मानवी व्यक्ति आहेत अशी कल्पना करूनहि गीतें लिहिलीं नाहीत.

## बालकवींच्या निसर्गगीतांचें अभिनव स्वरूप

बालकवींचीं निसर्गगीतें मात्र सर्वस्वीं भिन्न स्वरूपाचीं आहेत. केशवसुतांप्रमाणें त्यांनी कांहीं गीतांमधून निसर्ग व मानव यांमधील आत्यंतिक

विरोध व्यक्त केला आहे हें खरें आहे. तथापि त्यांची सर्वांत गाजलेलीं जीं निसर्गगीतें आहेत, त्यांमध्यें हा विरोधाचा आविष्कार बराचसा सौम्य झालेला असून ' अरुण ', ' फुलराणी ', ' संध्यारजनी ', 'संध्यातारक', ' शुक्रोदय ', ' ताराराणी ', इत्यादि कवितांत तर या विरोधाचा लेशहि दिसणार नाहीं. संगीताची निर्मिति ज्यायोगें होईल असे ललित व मधुर शब्द वापरून उत्कृष्ट कल्पनादृश्यें निर्माण करणें हाच बालकवींचा या सर्व गीतांत एकमेव हेतु दिसत आहे. आणि या प्रकारचीं गीतें एका बालकवींशिवाय दुसऱ्या कोणत्याहि आधुनिक मराठी कवीनें धुंद मनानें स्वप्नसृष्टींत विहार करून व तेथें अगदीं तन्मय होऊन लिहिलीं नाहींत. निसर्गातील दृश्यांवर चैतन्याचा असला आतिरिक्त अध्यारोपहि दुसऱ्या कोणत्याच कवीने केला नाहीं; आणि रंग व ध्वनि यांची असली लयलूटहि कोणीं केली नाहीं. निसर्गाचें वर्णन करीत असतां उन्मादक स्वप्नसृष्टि तत्क्षणीं निर्माण करून त्या स्वप्नसृष्टींतील आभासात्मक लावण्यलतिकांशीं इतका तन्मय होणारा बालकवि हा एकच कवि होय. याच अर्थानें बालकवि हे निसर्गवर्णनें पूर्ण स्वतंत्र वृत्तीनें करणारे कवि होत असें विधान वर केलें आहे. ही सर्वस्वीं नवीन कविता होय. वैचारिक भूमिका, कल्पनाविलास, संवेदना, मनोवृत्ति या कोणत्याहि बाबतींत केशवसुत अथवा टिळक यांच्या कवितांशीं बालकवींच्या निसर्गगीतांची खऱ्या अर्थानें तुलना करता येणें शक्य नाहीं. एखादी दुसरी गोष्ट समान आढळली तरी ती परिपूर्ण तुलना करण्यास उपयोगी पडणार नाहीं. केशवसुतांना निसर्गांत जीं दृश्यें दिसलीं त्यापेक्षां अगदीं भिन्न दृश्यांनीं बालकवींचें मन आकृष्ट केलें; आणि निसर्गांतील वस्तु पाहिल्याबरोबर केशवसुतांच्या मनांत ज्या प्रकारच्या संवेदना निर्माण झाल्या त्यापेक्षां अगदीं निराळ्या प्रकारच्या संवेदना बालकवींच्या मनांत निर्माण झाल्या. निसर्ग हा मानवाला बोध किंवा उपदेश करतो अशी वर्ड्स्वर्थप्रमाणें टिळकांची विचारसरणी होती. बालकवींच्या ठायीं या विचारसरणीचा लेशहि आढळावयाचा नाहीं. गडकऱ्यांची निसर्ग-

वर्णनाची पद्धति निराळी आणि बालकवींची पद्धति निराळी. दोघांच्या कल्पनाविलासांत कांहीं बाबतींत थोडेसें साम्य असलें तरी एकंदरींत पाहतां बालकवींचीं कविता ही प्रकृतीनें व प्रवृत्तीनें वर उल्लेखिलेल्या तीन कवींच्या कवितांपेक्षां पुष्कळच वेगळी आहे हें सहज दिसून येण्यासारखें आहे. बालकवींच्या स्फूर्तींचीं उगमस्थानें वेगळीं, ज्यांमध्यें त्यांचें चित्त सहज रममाण होत असे त्या गोष्टी वेगळया, कल्पनाविलासाचें स्वरूपहि वेगळें. बालकवींनीं आपल्या कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें निर्माण केलेलें कलात्मक जगत् पूर्णपणें अभिनव आहे यांत शंका नाहीं.

## बालकवींचा संप्रदाय कां नाहीं ?

पण हें अभिनव कलात्मक जग निर्माण करण्याचें श्रेय बालकवींचें असलें तरी या त्यांच्या जगांत इतर कोणीहि प्रवेश करूं शकला नाहीं हीहि गोष्ट विसरतां यावयाची नाहीं. याचा अर्थ असा कीं, बालकवींच्या काळीं अथवा त्यांच्या निधनानंतर सर्वस्वीं त्यांचें अनुकरण करून त्यांच्याच पद्धतीनें निसर्गगीतें लिहिण्याचा कोणत्याहि कवीनें नुसता प्रयत्नहि करून पाहिला नाहीं. बालकवींच्या कवितेनें एक अभिनव पर्व निर्माण झालें हें अगदीं खरें असलें तरी त्यांच्याच भाषेंत बोलावयाचें झालें तर ' डोळ्यांना क्षण तेज दाखवुनिया अस्तंगता हो क्षणीं ' अशीच त्याची अवस्था झाली. केशवसुतांच्या काव्याचा तत्कालीन व उत्तरकालीन अनेक कवींवर इतका जबरदस्त परिणाम घडून आला कीं केशवसुतांचा संप्रदाय हाच आपला संप्रदाय होय व त्यांच्या पद्धतीनें कविता लिहिणें हेंच सर्वांत मोठें स्पृहणीय कार्य होय असें अनेकांनीं प्रामाणिकपणें मानलें आणि प्रत्यक्ष अशा पद्धतीच्या कविताहि लिहिल्या. ' तुतारी 'चें अनुकरण करणें याच एका उद्देशानें गेल्या पन्नास वर्षांत लिहिल्या गेलेल्या कवितांची लांब यादी पाहिली म्हणजे ही गोष्ट ताबडतोब स्पष्ट होईल. बालकवींच्या बाबतींत असें कांहींच झालें नाहीं. त्यांच्या निसर्गकाव्याची मोहिनी तत्का-

लीन वाचकांवर पुष्कळ होती आणि त्यांच्या निधनानंतरहि ही मोहिनी कमी झाली असें मुळींच नाहीं. तथापि बालकवींचें अनुकरण करून त्यांच्याच पद्धतीनें सतत अनेक निसर्गगीतें लिहिण्याचें कोणाहि कवीच्या मनांत आलें नाहीं ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. बालकवींच्या पद्धतीचे अनुकरण करून गडकऱ्यांनी ‘ अरुण ’ आणि ‘ प्रेमपाठ ’ या कविता लिहिल्या हें खरें आहे. तथापि बालकवींच्या या पद्धतीचा प्रभावी परिणाम गडकऱ्यांच्या मनावर झाला असें म्हणवत नाहीं. एखादा गायक केवळ वैचित्र्य म्हणून ज्याप्रमाणें कांहीं निराळ्या प्रकारचें गाऊन जातो त्याप्रमाणें गडकऱ्यांनींहि केवळ वैचित्र्य म्हणून, केवळ गंमत म्हणून, या कविता लिहिल्या असाव्यात असें वाटतें. त्यांनी या पद्धतीची पुनरुक्ति केली नाहीं यावरून या तर्काला बळकटी येते. गडकरी हे बालकवींचे समकालीन व त्यांच्या निकटवर्ती मित्रांपैकीं एक होते. यामुळें आपल्या मित्रावरील स्नेहाच्या पोटींहि गडकऱ्यांनीं बालकवींचें गमतीनें किंवा कौतुकानें अनुकरण केलें असेल. तें कांहींहि असो, बालकवींच्या पश्चात् त्यांच्या कल्पनाविलासाचें स्वरूप बऱ्हंशी ज्यांत दिसून येईल अशा कविता लिहिण्याचें कोणाच्याहि मनांत आलें नाहीं इतकें मात्र खरें. याचें सर्वांत महत्त्वाचें कारण असें कीं, बालकवींच्या कवितांमधील स्वप्नसृष्टि सकृद्दर्शनीं आकर्षक वाटते हें खरें असलें तरी तिची खरी भुरळ फार काळ टिकणेंच शक्य नाहीं. बालकवींना दिसलेलीं स्वप्नदृश्यें जशीं क्षणिक त्याप्रमाणेंच त्या स्वप्नदृश्यांच्या वर्णनांपासून होणारा परिणामहि क्षणिकच. केवळ स्वप्नसृष्टी-मध्यें सदैव धुंद होऊन व्यावहारिक जगताला पारखा होणारा कवि हा आपला निकटवर्ती मित्र असावा असें वाटणें जरा कठिणच. त्याच्याशीं वरवर ओळख असावी येवढें फार तर एखाद्याला वाटेल. पण त्याच्या सहवासांत नेहमीं रहावें असें त्याला वाटणार नाहीं. स्वप्नसृष्टि ही स्वप्नसृष्टीच असते या सत्याचा साक्षात्कार होतांक्षणींच व्यावहारिक जगतांतील प्रत्यहीं घडणाऱ्या घटनांची ओढ माणसाला लागूं लागते; आणि ‘ पुरीं झालीं हीं

स्वप्नें ' असे उद्‌गार आपोआप त्याच्या तोंडून बाहेर पडतात. बालकवींचीं कवनें स्वैर कल्पनाविलास व भुरळ पाडणारी शब्दरचना या गोष्टींमुळें मोहक वाटलीं तरी तो मोहकपणा इतका लिवलिवीत आहे कीं त्याला स्थिर-पणा कसा तो ठाऊक नाहीं. तात्पर्य, खपुष्प, गंधर्वनगर, मृगजळ इत्यादींचा मोहकपणा अवास्तव गोष्टींवर आधारलेला असल्यामुळें जसा क्षणिक तसाच बालकवींनीं निर्मिलेल्या स्वप्नसृष्टीचा मोहकपणाहि क्षणिकच ! अशा स्थितींत या स्वप्नसृष्टीचा आविष्कार करण्याची इच्छा जर बालकवींनंतर कोणालाहि झाली नसली तर त्यांत अस्वाभाविक असें कांहींहि झालें नाहीं असें म्हणणें भाग आहे. एवंच, बालकवींचा संप्रदाय निर्माणच झाला नाहीं आणि तो निर्माण झाला असता तरी त्याचें आयुष्य अत्यंत अल्पच ठरलें असतें यांत मुळींच संदेह नाहीं. वाङ्मयाच्या क्षेत्रांत अशा घटना नेहमीं घडत असतात. कांहीं गोष्टी चांगल्या वाटल्या तरी त्यांना बेताचेंच स्थैर्य लाभतें आणि त्यांचा चांगुलपणा आकर्षक असला तरी तो अनुकरणीय खास नसतो. आणि जरी त्याचें अनुकरण करण्याचा एखाद्यानें प्रयत्न करून पाहिला आणि तो थोडाफार यशस्वीहि झाला तरी पुन्हा अनुकरण करण्याचा त्याला धीर होत नाहीं. जिचें अनुकरण करतांच येणें शक्य नाहीं असलीं कांहीं अलौकिक, असामान्य प्रतिमा बालकवींना खास लाभ-लेली नव्हती, पण त्या प्रतिभेचा ज्या पद्धतीनें आविष्कार झालेला आहे ती पद्धति इतरांच्या अंगवळणीं पडणें अशक्य नसलें तरी अत्यंत अवघड आहे. शिवाय बालकवींची मनोवृत्तीच असल्या आविष्काराला सर्वस्वीं अनुकूल आहे. त्यामुळें बालकवींचीच मनोवृत्ति ज्याची असेल अशा स्वप्नाळू, हळव्या, भावनाशील, संवेदनशील कवीलाच केवळ बालकवींच्या पद्धतीचें यथार्थ रीतीनें अनुकरण करतां येणें शक्य आहे. आणि स्वप्नाच्या गोड धुंदींतच तल्लीन होऊन जाण्याची बालकवींची अतिरिक्त वृत्ति जवळ जवळ अपवादात्मकच ! तात्पर्य, बालकवींसारखें शब्दरचनाचातुर्य व त्यांच्यासारखी कल्पनाशक्ति या दोनच गोष्टी प्राप्त होऊन भागणार नाहीं.

त्यांच्याच पद्धतीनें स्वप्नसृष्टीचें वर्णन करावयाचें असेल तर त्यांची मनोवृत्ति प्राप्त झाली पाहिजे. आणि असली मनोवृत्ति प्राप्त झालेली नसल्यामुळें कोणाहि कवीनें बालकवींचा संप्रदाय पुढें चालू ठेवण्याची धडपड केली नाहीं.

## कवि या दृष्टीनें बालकवींच्या मर्यादा

या गोष्टी चित्तांत चांगल्या वागविल्या म्हणजे आधुनिक मराठी काव्याच्या क्षेत्रांत बालकवींनीं केलेल्या कामगिरीचें खरें स्वरूप अजमावतां येईल व त्यांच्या कवित्वाचें गौरव कोणत्या मर्यादेपर्यंत करतां येईल या गोष्टींचा उमज पडेल. एक गोष्ट प्रथम स्पष्ट करावयास पाहिजे. ती ही कीं, ज्यांना ' थोर कवि ' असें बिरुद आपण न कचरतां देऊं अशा कवींच्या रांगेंत बालकवींना मुळींच स्थान नाहीं. पण थोर कवि ही संज्ञा प्राप्त करून घेण्याचें भाग्य एखाद्याला प्राप्त झालें नाहीं तरी कलात्मक चातुर्य विविध प्रकारांनीं दाखविणें त्याला शक्य असतें. आणि बालकवींच्या बाबतींत हें अगदीं खरें आहे. कलेची कारागिरी म्हणून जी गोष्ट आहे, तिच्या बाबतींत बालकवींनीं दाखविलेलें कौशल्य स्पृहणीय आहे, मोहक आहे, मुरळ पाडणारें आहे हें सारें कबूल करूनहि त्यांना थोर कवि म्हणावें असा विचार स्वप्नांत सुद्धां माझ्या मनांत डोकावत नाहीं !

कवि या दृष्टीनें बालकवींच्या ज्या मर्यादा आहेत त्या कोणाहि जाणत्या रसिकाच्या लक्षांत सहज येतील. त्यांच्या उणीवा अगदीं स्पष्ट आहेत व त्यांच्याकडे दुर्लक्ष करण्याचें कांहींच कारण नाहीं. बालकवींची कल्पनाशक्ति उच्च प्रतीची आहे व तिच्या साहाय्यानें त्यांनीं निसर्गातील विविध दृश्यांमधील सौंदर्याचें आविष्करण यशस्वी रीतीनें केलें आहे. त्यांचा कल्पना-विलास डोळे दिपवून टाकतो यांत शंका नाहीं. पण हें सारें विद्युदुन्मेषा-प्रमाणें आहे. वीज लखलखते आणि अदृश्य होते. त्याप्रमाणें बालकवींनीं निर्मिलेल्या रुचिर दृश्यांमुळें क्षणभर मनाला बरें वाटतें; पण त्यांचा मनावर

कसलाहि स्थिर संस्कार मात्र होऊं शकत नाहीं. काहीं रम्य दृश्ये आपल्या दृष्टीपुढें तरळून जातात हे खरें असलें तरी वस्तुजातांतील मर्माचें आकलन बालकवींच्या कल्पनाशक्तीला करता आले नाही. याहून किती तरी उच्च प्रकारची कल्पनाशक्ति असूं शकते; आणि वस्तुजातांतील मर्म हुडकून काढण्याची तिला लालसा असते. असली कल्पनाशक्ति मानवी जीवनाचे मर्म अचूक हेरते आणि मानवी मनांतील विचित्र गुंतागुंत उकलून ती जीवनाचें भाष्य निर्माण करूं शकते. सर्व थोर कवींच्या प्रतिभेने हें केलेलें आहे. हें कार्य आपल्याला महाभारतांत झालेलें दिसेल, रामायणांत झालेलें दिसेल. शेक्सपियरने या बाबतींत अत्यंत थोर कामगिरी करून दाखविली आहे. महाकवि सोडून दिले तरी त्यांच्यापेक्षां योग्यतेनें कितीतरी खालीं असलेल्या कवींनींहि ही कामगिरी आपल्या मगदुराप्रमाणें केली आहे. परंतु बालकवींची प्रतिभा या बाजूला वळलीच नाहीं. मानवी मनाची गुंतागुंत गडकऱ्यांनी आपल्या कांहीं प्रेमगीतांतून आकर्षकपणें वर्णिली आहे. कल्पनाशक्तीचें असले कांहीं भारदस्त कार्य असूं शकतें याची बालकवींना पुसटसुद्धां कल्पना नाहीं. मानवी भावनांच्या अनंत छटा असतात. हें वैचित्र्य मानवी जीवनांत आहे म्हणून तर तें इतकें आकर्षक झालें आहे. या वैचित्र्याचा आविष्कार बालकवींच्या गीतांत आपणांस मुळींच सांपडावयाचा नाहीं. त्यांच्या गीतांत भावनांच्या फारच थोड्या छटा आपणांस दिसतील. निसर्गांतील दिव्य सौंदर्य व अलौकिक आनंद आणि मानवी जीवनाची अपूर्णता याच कल्पना प्राधान्येंकरून त्यांनीं आविष्कृत केल्या आहेत. उत्कट, रसरसलेली व धुंद करणारी प्रणयासक्तीहि त्यांच्या कवितांतून प्रकट झालेली नाहीं. आणि दारुण प्रेमभंगामुळें येणाऱ्या आत्यंतिक नैराश्याचें आविष्करण त्यांत नाहीं. प्रेमाच्या इतर अनेक छटा मानवी जीवनांत असतात. त्यांचेंहि आविष्करण बालकवींनीं केलें नाहीं. सौंदर्याच्या अमूर्त तत्त्वाभोंवतीं व अतींद्रिय प्रेमाच्या कल्पनेभोंवतीं त्यांचें मन सतत रुंजी घालीत आहे. हेंच एक बालकवींच्या जीवनाचें सार बनलेलें आहे. आणि दिव्य सौंदर्याचा

साक्षात्कार व अतींद्रिय प्रेमाची तळमळ हेंच काय ते त्यांच्या कवितेचेंहि परमोच्च ध्येय बनलें आहे. बालकवींचा इतका रम्य कल्पनाविलास या एकाच कल्पनेंत सर्वस्वी विलीन व्हावा याचें वाईट वाटतें. एकाच गोष्टीभोंवतीं बालकवींचा हा कल्पनाविलास घोटाळत राहिल्यामुळें त्याचा आविष्कारहि वैचित्र्यहीन व कंटाळवाणा होणें अपरिहार्य आहे. यामुळें ठराविक संकेतांची, कल्पनांची, शब्दांची, रंगांची व दृश्यांची पुन्हां पुन्हां पुनरुक्ति बालकवींना करावी लागली आहे. किंबहुना, अमूर्त सौंदर्याचा साक्षात्कार व अतींद्रिय प्रेमाची लालसा या गोष्टी मानवी जीवनाचें एकमेव ध्येय होणेंच अशक्य आहे. आणि एखाद्यानें बालकवींप्रमाणें तेंच एक ध्येय मानलें तर त्या ध्येयाचा कांचनमृग पाहता पाहतां दृष्टीआड होईल, स्वप्नसृष्टि विरून जाईल, आणि मग आत्यंतिक विषण्णतेशिवाय दुसरें कांहींहि पदरांत पडावयाचें नाहीं.

## बालकवींचें अत्यंत मर्यादित कलाजगत्

मानवी जीवनांतील अनेक प्रकारच्या, सुखद व दुःखद घटनांची जाणीव ज्यांना आहे व त्या घटनांतील मर्म समजावून घेण्याची तीव्र लालसा ज्यांना असते असे मोठे कवि केवळ एकाच—आणि विशेषेंकरून अमूर्त व अतींद्रिय—गोष्टीभोंवतीं आपल्या प्रतिभेला कधींच घुटमळूं देत नाहींत. त्यांची प्रतिभा विश्वसंचारी असते. यामुळें केवळ निसर्गाच्या रमणीय स्वरूपांत तादात्म्य पावलेल्या बालकवींच्या प्रतिभेचा आविष्कार एका लहानशा मर्यादित जागेंत आपल्या भोंवतींच गरगर फिरत राहिला असला तर त्यांत कांहींहि नवल नाही.

आपल्या सभोंवतीं चाललेल्या विविध राजकीय व सामाजिक घटनांकडे बालकवींनीं दुर्लक्ष केलें व कलेची स्वप्नसृष्टि निर्माण केली हें त्यांच्या स्वभावधर्माप्रमाणेंच झालें असें मानून बालकवींच्या काव्यांतील या घटनांच्या उल्लेखाच्या अभावाबद्दल आपण त्यांना माफ करूं. पण केवळ

आपल्या कल्पनाशक्तीवरच भरंवसा ठेवून त्यांनीं कलेचें जें स्वतंत्र जग निर्माण केलें त्यांतहि केवळ एकच एक भावना पुनः पुनः प्रकट करण्यापलीकडे त्यांच्या प्रतिभेनें इतर काय केलें असा प्रश्न कोणी विचारला तर त्यांत कांहींच वावगें नाहीं. मानवी मनांतील विविध भावनांचें आविष्करण त्यांनीं केलें नाहीं अथवा प्रणयाची विविध रूपें दाखविलीं नाहींत, किंवा मानवी सौंदर्याचें व त्याच्या असामान्य प्रभावाचेंहि त्यांनीं वर्णन केलें नाहीं. बरें, निसर्गाचें वर्णन हा खास त्यांचा प्रांत. त्याहि प्रांतांत त्यांनीं प्रभातकाळ,सायंकाळ, तारका, मंद वारा, निर्झर इत्यादींचेंच सौंदर्य वर्णिलें आहे. निसर्गाचें केवळ रम्य रूपच त्यांना दिसलें. अर्थात् प्रभातकालीन व सायंकालीन आकाश सुंदर नसतें अथवा तारकांची शोभा आकर्षक नसते असे कोण म्हणेल ? पण निसर्गाच्या या स्वरूपांत जसें सौंदर्य सामावलेलें आहे, तसेंच ते निसर्गाच्या इतर स्वरूपांतहि सामावलेलें आहे. आणि दुर्दैवानें बालकवींना या इतर दृश्यांतील सौंदर्याची जाणीवच झाली नाहीं. आकर्षक चंद्रप्रकाशांत निथळून निघणारा भूभाग जितका आकर्षक, तितकाच ढगाच्या विरळ वस्त्राच्या अवगुंठनाआड दडलेला चंद्रहि आकर्षक असतो. किंवा निरभ्र काळोख्या रात्रीं तारकांचें नर्तन अत्यंत मोहक वाटलें तरी चांदण्याच्या रसांत विरघळणाऱ्या तारकाहि कांहीं कमी रमणीय नसतात. पौर्णिमेचा परिपूर्ण चंद्र जितका मोहक तितकाच चतुर्थीचा चंद्रहि मोहक असतो. आणि बीजेच्या चंद्रकोरीचें लावण्य कांहीं कमी असतें काय ? वस्तुजातांत सौंदर्य पाहणाऱ्या प्रतिभाशाली कवीला केवळ शरदृतूंतील पूर्णिमेच्या चांदण्यांतील सौंदर्य तेवढें दिसतें आणि ऐन हिंवाळ्यामध्यें तुषारमलिन झालेली ज्योत्स्ना त्याला भुरळ घालूं शकत नाहीं असें होत नाहीं. ‘ तुषारवर्षी सहस्यचन्द्रमा ’ त्याला आकर्षून घेणारच. निसर्गांत जर ठायीं ठायीं सौंदर्य भरलेलें आहे तर तें निसर्गाच्या सर्व स्वरूपांत सामावलेलें असलेंच पाहिजे. आणि हें लक्षांत घेतलें म्हणजे वादळांतील खवळलेला दर्या, सोसाट्याचा वारा, मुसळधार पाऊस, मेघांचा भयानक कड-

कडाट, पुरामुळें दुथडी वाहणारी नदी, धुक्यांत पूर्ण गुरफटून गेलेला भूभाग, इतकेंच नव्हे तर ऐन उन्हाळ्यांतील भर बारा वाजावयाच्या वेळीं दिसणारें निसर्गाचें स्वरूप – सर्वत्र कांहीं तरी सौंदर्य भरलेले आहेच आहे. आणि या विविध निसर्गसौंदर्याची बालकवींना जाणीवहि नाहीं. त्यांना निसर्गाचें केवळ सौम्य, नाजुक साजुक रूप तेवढेंच दिसतें. निसर्गाचें भव्य व रौद्र स्वरूप पाहावें व त्याचें असामान्य सौंदर्य वर्णावें असें त्यांना चुकून देखील वाटलें नाहीं. अस्मानाला भिडलेलीं पर्वतशिखरें, प्रचंड धबधबे, किर्र झाडी, यांत केवढें तरी सौंदर्य आहे ! पण इवलालीं तृणफुलें व चमचमणाऱ्या तारका, निळे सावळे झरे व लुसलुशीत हिरवळ यांतच सारें निसर्गसौंदर्य सांठविलेलें आहे असें वाटणाऱ्या बालकवींचा निसर्गाच्या सान्निध्यांत एकच प्रकारचा mood राहिला तर तें अपरिहार्यच आहे. निसर्गाच्या सुकुमार रूपाचें वर्णन करूं नये असें कोण म्हणेल ? तें अवश्य करावें. पण तेवढेंच फक्त नेहमीं करीत बसूं नये. निसर्गाच्या सर्व प्रकारच्या दृश्यांतील सौंदर्य शोधून काढावें.

तात्पर्य, बालकवींचें काव्य म्हणजे चांदणें, मंद वाऱ्याच्या झुळकी, तारका व हिरवळ ! या पलीकडे फारच अफाट जग आहे व तेथें नेहमींच उगवत्या सूर्याचे कोवळे किरण अथवा मावळत्या सूर्याचें आरक्त सौंदर्य, किंवा मृदुल चांदणें या गोष्टी नसून सूर्याचा प्रखर प्रकाश अनेक वेळां असतो व त्याचे चटके सोसल्याशिवाय सायंकाळची रमणीय शोभा पाहावयास सापडत नाहीं हें बालकवींच्या लक्षांत न आल्यामुळें त्यांचा निसर्ग छोट्याशा कुरणांत सामावलेला आहे. या कुरणापलीकडे व त्यावर रात्रीं चमचमणाऱ्या तारकांच्या पलीकडे बालकवींच्या दृष्टीनें निसर्ग फारसा उरलेला नाहीं. त्या कुरणाच्या बाजूनें अवखळपणें वाहणारा ओढा यांच्या भरीला घातला म्हणजे संपला बालकवींच्या निसर्गाचा व्याप ! आणि या निसर्गाच्या पार्श्वभूमीवर विविध अवस्थांतून संक्रांत होत जाणारें गुंतागुंतीचें मानवी जीवन ! त्याचा तर बालकवींच्या गीतांत पत्ताच नाहीं.

Human touch नसेल तर त्या निर्जन निसर्गांत कोणतेंहि आकर्षण नाहीं. मानव आहे म्हणून निसर्ग आहे. मानवावांचून नुसत्या निसर्गाची काय मातब्बरी ? आणि बालकवींनीं तर भावनांनीं रसरसलेल्या मानवाचीच उपेक्षा केली आहे. कवि या दृष्टीनें बालकवींचें जें कार्य आहे त्यांत यामुळें केवढें तरी वैगुण्य आलें आहे !

## स्वप्नसृष्टींतून मानवी जगतांत

या वैगुण्यामुळे थोर कवींच्या पंक्तींत बालकवींना केव्हांहि स्थान मिळणें शक्य नाहीं. पण आपल्या इवल्याशा जगांत बालकवींनीं कल्पनेच्या साहाय्यानें जें काव्याचें उद्यान बनविलें त्यांत मात्र रमणीय फुलें, नाजुक वेली, हिरवीगार हिरवळ, उत्कृष्ट लताकुंज इत्यादींची विपुलता आहे. आणि या साऱ्या गोष्टी त्यांनीं अत्यंत रमणीय करून सोडल्या आहेत. या स्वप्नभूमीवर चंद्रकिरण विरघळत आहेत, उद्यानांतील वातावरणांत पुष्पांची सुगंधवृष्टि मिसळून एक प्रकारची उन्मादक धुंदी निर्माण झाली आहे, मंद वारा केवळ कोंवळ्या वेलींनाच नाचवीत आहे—अशा या स्वर्गीय सृष्टीमध्यें मनाच्या तल्लीन अवस्थेंत

सुमकोषी आपोआप । क्षण घ्यावी साखरझोंप
डोलतची जागें व्हावें । हासतची गुंगत जावें

हे बोल स्वत:शींच गुणगुणत हिरवळीवरून बालकवि हिंडत आहेत असें मोहक दृश्य मला कधीं कधीं दिसतें !

पण हें दृश्य अवलोकनाच्या क्षणीं कितीहि मोहक वाटलें तरी हें स्वप्न आहे, हा आभास आहे, ही माया आहे, हा एक मतिभ्रम आहे हा विचार शल्यासारखा मनाला बोंचूं लागतो; आणि स्वप्नसृष्टींतील या रम्य उद्यानाचा, त्यांतील नाजुक हिरवळीचा, कोंवळ्या लतिकांचा निरोप घेऊन अनंत गुंतागुंती ज्यामध्यें ओतप्रोत भरलेल्या आहेत, आणि म्हणूनच जें अत्यंत आकर्षक झालें आहे अशा मानवी जगताची माझ्या मनाला ओढ

लागते. संकीर्ण स्वरूपाच्या या मानवी जीवनाचें मर्म उकलून दाखविण्याचा जो प्रामाणिकपणें प्रयत्न करीत असेल, परस्परविरोधी मनोविकारांनीं गूढ व अगम्य बनलेल्या मानवी स्वभावाचें यथातथ्य चित्र रेखाटण्याची ज्याची धडपड चालू असेल, मानवी ज्ञानाच्या आकलनापलीकडे असलेल्या असंख्य गूढ तत्त्वांच्या भोंवतीं असलेले आवरण दूर करून त्यांचें स्वरूप शक्य तेवढें आकलनीय करून दाखविण्याची जो महत्त्वाकांक्षा बाळगत असेल, आपल्या काळांतील समाजाच्या आकांक्षा प्रकट करण्याचें व्रत ज्यानें पत-करलें असेल अशा एखाद्या कवीचें सान्निध्य प्राप्त करून घ्यावें अशी तीव्र तळमळ मला लागते. लुसलुशीत कुरणांतून भव्य आणि उत्तुंग गिरिशिखराकडे धाव घ्यावी, घननील लतावलयांच्या सहवास सोडून गर्द अरण्याची भीषण-रमणीय शोभा पाहावी, पुष्करिणीच्या कांठावर उभें राहून पाण्यांत डोका-वून पाहण्याचें समाधान मिळविण्याऐवजीं खोल दरीच्या विक्राळपणांतील सौंदर्य पाहावें, संथ वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहाबरोबर अथांग दर्याकडे जावें, आणि चंद्रप्रकाशांत विरघळणाऱ्या तारकांचें सौंदर्य पाहून झाल्यावर वादळाच्या वेळीं प्रचंड मेघांनी झाकाळून गेलेल्या आकाशाचें रौद्र स्वरूप पहावें अशी लालसा मला होऊं लागते. आणि यामुळें बालकवींच्या कलाकुंजांत क्षणभर थांबल्यावर व्यावहारिक जगताकडे धाव घेण्याची व त्या जगतांतील अगणित भावनांचीं विलसितें प्रकट करून मानवी जीवनाचें भाष्य निर्माण करूं पाहणाऱ्या थोर कवींच्या आकर्षक सान्निध्यांत राहण्याची तीव्र इच्छा मला होऊं लागते !

———

# परिशिष्ट

## — १ —

## बालकवींच्या गीतांचें विषयवारीनें वर्गीकरण

### निसर्गगीतें

( १ ) अरुण ( २ ) निर्झरास ( ३ ) फुलराणी ( ४ ) संध्यारजनी ( ५ ) शारदीय सौंदर्यदेवता ( ६ ) संध्यातारक ( ७ ) शुक्रोदय ( ८ ) मधु-यामिनी ( ९ ) बाळें तीं खेळत होतीं ( १० ) ताराराणी ( ११ ) फुल-पांखरूं–फुलवेली ( १२ ) श्रावणमास ( १३ ) पाऊस ( १४ ) अष्ट-दिशांचा गोफ

### प्रेमगीतें

( १ ) प्रेमाचा पहिला मास ( २ ) जादुगारीण ( ३ ) कवीची इच्छा ( ४ ) — ला ( ५ ) मटकणें ( ६ ) प्रीति हवी तर ( ७ ) दिव्य आणि प्रीति ( ८ ) प्रेमाचें गाणें

### औदासीन्य, विषण्णता

( १ ) निराशा ( २ ) प्रीति व कर्तव्य ( ३ ) उदासीनता ( ४ ) काळास ( ५ ) रजनीस आव्हान ( ६ ) शून्य मनाचा घुमट ( ७ ) पांखरास.

### आनंदोद्रेक

( १ ) शारदेस ( २ ) आनंदीआनंद ( ३ ) अष्टदिशांचा गोफ ( ४ ) बाळें तीं खेळत होतीं

### सौंदर्याचा साक्षात्कार

.( १ ) अष्टदिशांचा गोफ ( २ ) शुक्रोदय ( ३ ) तडाग असतों तर ( ४ ) तेजोर्वाणेची रागदारी ( ५ ) निर्झरास ( ६ ) सौंदर्याचा अभ्यास कर

**मानवी जीवनाचें ध्येय**

( १ ) कवीची इच्छा ( २ ) तारकांचें गाणें ( ३ ) अष्टदिशांचा गोफ

**काव्याचा उद्गम व त्याचें स्वरूप**

( १ ) काव्याची कल्पना

**मानवी जीवन व निसर्ग यांमधील विरोध**

( १ ) अतृप्ति ( २ ) पारवा ( ३ ) निर्झरास ( ४ ) अष्टदिशांचा गोफ ( ५ ) पांखरास ( ६ ) कविबाळें

**अज्ञेयवाद**

( १ ) काळाचे लेख ( २ ) शून्य

**तात्त्विक विचार**

( १ ) जिज्ञासु ( २ ) आवाहन ( ३ ) संशय ( ४ ) कवीचा विचार ( ५ ) संशय ( ६ ) हृदयाची गुंतागुंत

**ईश्वरवाद**

( १ ) संतांचा अनुवाद

**संशयवाद**

( १ ) हृदयाची गुंतागुंत ( २ ) रजनीस आव्हान ( ३ ) कवीची इच्छा ( ४ ) जिज्ञासु ( ५ ) संशय ( ६ ) संशय ( ७ ) हृदयाची गुंतागुंत

**समतावाद**

( १ ) धर्मवीर ( २ ) ध्येय

**निसर्गांत प्रेमाचा साक्षात्कार**

( १ ) अरुण ( २ ) संध्यारजनी ( ३ ) निर्झरास ( ४ ) फुलराणी ( ५ ) संध्यातारक ( ६ ) मंगलमय प्रेमकवन ( ७ ) तारकांचें गाणें.

**निसर्गाचें संगीत**

( १ ) आनंदीआनंद ( २ ) फुलपांखरूं—फुलवेली ( ३ ) अरुण ( ४ ) निर्झरास ( ५ ) फुलराणी

निसर्गांतील रंगछटा

( १ ) फुलपांखरूं–फुलवेली ( २ ) श्रावणमास ( ३ ) पाऊस ( ४ ) अरुण ( ५ ) संध्यारजनी ( ६ ) निर्झरास ( ७ ) फुलराणी ( ८ ) अष्टदिशांचा गोफ ( ९ ) प्रेमलेख ( १० ) बाळें तीं खेळत होतीं ( ११ ) मेघांचा कापूस ( १२ ) औदुंबर

इतिहासकालीन वातावरण

( १ ) जीर्ण दुर्ग ( २ ) वीरगडी ( ३ ) शाहीर ( ४ ) प्रतापसिंह ( ५ ) दौलतरावांची मंजुळा ( ६ ) वीर मराठा ( ७ ) रणघोष

—∞०∞—

## – २ –

## बालकवींच्या कवितांतील महत्त्वाचीं अवतरणें

### मानवी जीवन

(१) तारुण्य भ्रष्ट हो जेथें । प्रेमास अंधता येते
सौख्यातिरेकही पाहीं । दुःखाला कारण होई
संध्येच्या सुंदर छाया । निमिषांतच काजळताती
करि घोर भयद अंधार । नैराश्यविषाची भरती
या अपूर्ण जगतासंगे । मन तृप्ति कधींहि न पावे (अतृप्ति)

(२) जें तें नश्वर ! हाय हाय ! म्हणुनी निःश्वास टाकी मही !
( काल आणि जीवित )

(३) फिरे माझ्या जगतांत उष्ण वारे
तुला त्याचें तर भानही न बारे ! ( पारवा )

(४) झोप सौख्यानंदांत मानवाची
पुरी क्षणही कोठून टिकायाची ? ( पारवा )

(५) या क्षुद्र मर्त्यदेहीं आसक्ती अल्प राहिली नाहीं. (शारदेस)

(६) स्वार्थाच्या बाजारांत
किती पामरें रडतात,
त्यांना मोद कसा मिळतो
सोडुनि स्वार्था तो जातो. ( आनंदी आनंद )

(७) भवदुःखाच्या अनंत डोहीं परि बुडतो पाहीं
शांति मिळेना क्षणभर जीवा विश्रांती नाहीं.
( अष्टदिशांचा गोफ )

(८) दिव्यानंदीं म्हणुनि उमाळा दुःखाचा वाटे
सत्यहि जो आनंद कल्पनामय केवळ वाटे.
( अष्टदिशांचा गोफ )

(९) अपूर्णताहि या परि मजला जरि बुडवी शोकीं
( अष्टदिशांचा गोफ )

(१०) परि त्याच दीर्घ किंकाळ्या ठरतात जगाचीं गाणीं !
निःश्वास अंत जे कढती ती स्फूर्ति लोक हा मानी
संतप्त अश्रुमालेला गागितात कल्पनाश्रेणी ! ( कविबाळें )

(११) निःश्वास धावती सौख्यामागें सारे
दुःखाचा वाली कुणा कुणीहि न बारे ! ( पांखरास )

(१२) अपूर्णतेनें पूर्ण निराशा हृदयाची होते
अमृत मुखाशीं नेतां नेतां विषमय हो येथें. ( जिज्ञासु )

(१३) शिगले कोणी संसाराचा वाहुनि माथां भार,
अनंत चिंताकाट्ठूरांनीं भरे कुणाचें ऊर. ( आवाहन )

(१४) पक्वपणाची पिवळी छाया सुंदरतेवर रांगे ( आवाहन )

**सौंदर्य**

(१) सुंदरतेच्या सुमनावरचें दंव चुंबुनि घ्यावें.
चैतन्याच्या गोड कोंवळया उन्हांत हिंडावें(अष्टदिशांचा गोफ)

(२) सुंदर तें तें नटवून । कोमल तें तें खुलवून

प्रेमाच्या वस्तीकरितां। जग सगळें फुलवूं आतां.

( तारकांचें गाणें )

(३) करूं चला जयघोष तियेचा पाहिला मानच तिला
उदो उदो सौंदर्यदेवते, विश्वगोल बोलला.

( तेजोवीणेची रागदारी )

(४) होउनि सौंदर्यधनी, गुंजावी मंजुळ गाणीं

( कवीची इच्छा )

प्रेम

(१) प्रेम न मोजी क्षुद्र लौकिकाला ! ( अरुण )

(२) प्रेमावांचुनि फेड कशाची प्रेमानें व्हावी ? ( अरुण )

(३) सृष्टि निमाली स्वर्गहि नुरले। प्रेम मात्र मंगलमय भरलें.

( मंगलमय प्रेमकवन )

(४) निष्प्रेम मनाचें गाणें केविलवाणें
ते तुझें मात्र राहील तसेंच्या तैसें ( पांखरास )

(५) निष्प्रेम मनाला कोठेंही सुख नाहीं. ( पांखरास )

(६) प्रेमांतच झाला सारा। विश्वाचा अंतरभाव

( प्रेमाचा पहिला भास )

(७) जावो विश्व जळून, जीवित तुझें कालस्थलाबाधित
प्रीतीनें मज हा धडा शिकविला, हो शांति हस्तंगत

( काल आणि जीवित )

(८) प्रीति, माझ्या हृदयांत करी वास !
न्यूनतेला पूर्णत्व द्यावयास ! ( दोष व प्रीति )

(९) प्रीतीचा पथ हा भयाकुल दिसे, सौंदर्यसौदामिनी
डोळ्यांना क्षण तेज दाखवुनिया अस्तंगता हो क्षणीं.

( प्रीति व कर्तव्य )

(१०) दिव्य जिथें प्रीति तेथें
आलिंगुनि अन्योन्यातें
प्रीति तुला जर हवी खरी
विलीन हो दिव्यांत तरी ( दिव्य आणि प्रीति )

(११) दिव्य प्रीति संगमता
होऊं दे हृदयीं आतां
स्वर्भूची संगमता ती
मग येइल उतरुन चित्ती
स्वर्गभरा ती
प्रीति प्रीती
मी तूं ही अवघीं जगतीं
प्रीतीनें न्हालीं नुसतीं ( दिव्य आणि प्रीति )

(१२) प्रेमावांचुनि सर्व सुनें
जग भासें बापुडवाणें ! ( प्रेमाचें गाणें )

(१३) प्रेम जिथें तें कांतार
उघडें स्वर्गाचें द्वार ( प्रेमाचें गाणें )

(१४) प्रीति हवी तर जीव आधि कर अपुला कुरबान
प्रीति हवी तर तळहातावर घे कापुनि मान !
तलवारीची धार नागिणी लसलसती प्रीत
याद टेव अंगार जगाला लाविल निमिषांत !
प्रीति निर्मिली तुला वाटतें का दुबळ्यासाठीं
प्रीतिदेवि जगदेकवीर जो जाय तया पाठीं !
( प्रीति हवी तर )

(१५) प्रेमावांचुनि कोणता कवि पिसा गाईल गाणें तरी ?
गांणें प्रेमच तें स्फुरेल तरि कां निष्प्रेम चित्तावरी ?
( गाण्याची चढती कमान )

(१६) परि प्रीतिचा न्यारा वारा खबरदार आडविता याला !
( निःश्वास )

(१७) उग्ररूपिणी शिवा भवानी । प्रीतिदेवते उतरे भुवनीं
क्षुद्र मूषका काळा मूढा । पसर तुझ्या त्या कराल दाढा !
( निःश्वास )

(१८) निःश्वसितें तीं तीं प्रेमाचीं मुकीं कोंवळीं गीतें
फुलें अहा तीं प्रेमतरूचीं लाजविती स्वर्गातें !
( मूढ मालती )

(१९) प्रेम कल्पनामय प्रमांचा सेतू अद्भुत कांहीं
दिसला असतां जो कोणीही कधी पाहिला नाही.
( मूढ मालती )

(२०) सद्य जिवाला होय जाहला जरि विद्युत्पात
परि प्रीतीचा घात भयंकर दुसरा कल्पांत ।
जीवंतपणीं मरण घेउनी फिरणें जगतांत
सांठविली ब्रह्मांडदाहिनी दाहकता यांत ! (प्रीति हवी तर)

**मरण**

नाहिं खरें जगतीं मरण । काव्यपांखरूं बघा खुण
होइल मग सर्वचि गोड । मरण गोड जगणें गोड
दुःखाश्रूंतिल ही गोडी । हास्याहुनि नाहीं थोडी
( कवीची इच्छा )

**बाल्य**

प्रेमपूर्ण मधु बाल्य अहा तें
तुम्हां संगतीं येइल तेथें
मीही सोडुनि तारुण्यातें
होइल बाल पुन्हां.

प्रेमावांचुनि अन्य न कांहीं
दुष्टपणाचा स्पर्शहि नाहीं
अंधाराचा मागमूसही
न दिसे ज्या ठायीं;
त्या बाल्याच्या सीमेवरते
दुष्ट मत्सरी जगतापरतें
प्रेमाचें साम्राज्य सभोंतें
बनवोनी राहूं. ( सुकलेलीं फुलें )

---

## ३

## बालकवींच्या गीतांतील शब्दांची व कल्पनांची पुनरुक्ति

(१) तेजाची लयलूटच आज ( तडाग असतों तर-- )
तेजाची फुटली पेठ ( शुक्रोदय )

(२) तेज दाटलें शांति दाटली ( तडाग असतों तर— )
शांति दाटली निस्तुल ही ( शुक्रोदय )
शांति दाटली चोहिंकडे ( तारकांचें गाणें )

(३) मुकुट कळ्याचा दिव्य शिरीं–पीतांबर परिधान करी
( शुक्रोदय )
परिधान करी ती पीतांबर कटिभागीं
शिरिं मुकुट कळ्यांचा त्रिलोकसुखदा मूर्ति ( पांखरास )
उदयाचलि परिधान करुनिया पीतांबर येत.
मुकुट कळ्यांचा शिरीं, उषेचें सिंहासन केलें.
( शारदीय सौंदर्यदेवता )

(४) आन्दोलीं तुज नीज न येई ( संध्यातारक )

लहरींच्या सुंदर आंदोली ( संध्यातारक )
मंद वायुनें आंदोलन घेती ( शारदीय सौंदर्यदेवता )
आंदोलित नील सरी ( मधुयामिनी )
(५) वीर्यश्रीचा नवरा गाजी बेभान चरे समरामाजीं
( वीरगडी )
वीरश्री नवरा तो गाजी, बेभान चरे समरामाजीं
( रणघोष )

४

## भाषादूषण

| | |
|---|---|
| **उन्मलीत** मन तन्मय मुरलें | ( मंगलमय प्रेमकवन ) |
| **तुरळ** तारका चमचम करिती | ( तडाग असतों तर ) |
| मधुर मुखींचे **अश्रुमाळ** चुंबीत | ( पांखरास ) |
| **निद्रिस्त** विश्व डुलवोनी | ( ,, ) |
| सौंदर्य **हृदंगम** ज्योती | ( प्रेमाचा पहिला भास ) |
| विश्वाचा **अंतरभाव** | ( ,, ) |
| **जर्जरित** बाळ गालांत | ( बाळें तीं खेळत होतीं ) |
| हे देवी **विजयस्विनी** | ( घडग्यांतील रमणी ) |
| क्षणामधे **करपून भुगोल** | ( रणघोष ) |
| बेभान **चरे** समरामाजीं | ( ,, ) |
| **शतशा** देवाहुनी त्या **दुणा** | ( प्रतापसिंह ) |
| **नवा** युवा वनराज | ( शाहीर ) |
| धीर **धिंग** रणसिंग | ( ,, ) |
| **निबीडतर** पल्लवी | ( माझा लहानसा बाग ) |
| तो तेथें **दुरून** तंव एक **मधूप** आला | ( ,, ) |
| बघुनि ढंग **मधूर** फुलावरी | ( ,, ) |
| **शुंडा** मृदू मग मधूप्रति आकळाया | ( ,, ) |
| **सुपुष्प** नव लाधलें **पुनरपी** | ( ,, ) |

